


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

(१९६८)

वर्ष २४ वे

मूल्य २ रु.

# दीपावली

ऑगस्ट स्मृति : कथा विशेषांक



अनुक्रमणिका




ऑगस्ट--स्मृति : कथा विशेषांक

**वर्ष २४ वे • मूल्य २ रु.**

## *श्रे य ना मा व ली–*

आचार्य अत्रे–थोर साहित्यिकाचे **अरविंद ताटके** यानी रंगविलेले रसीले व्यक्तिचित्र • **आता जिणे लाजीरवाणे–** तिचे खरे ध्यानी येताच तो कोसळला–**श्रीधर घैसास** • **जन्नत**–वेश्येचेही मातृवात्सल्य असे उफाळून येते–**सुरेश वेंगुर्लेकर** • **आरसे**–इतके धन गोळा केले पण कुणाची धन झाली ?–**ना. व्यं. देशपांडे** • **रहस्य**–दीर्घ सहवासाने अलिप्ततेवर नकळत मात केली–**राजेंद्र बनहट्टी** • **पट**– नशिब एकदा देऊ लागले म्हणजे फाडून देते–**रवींद्र पिंगे** • **मधुचंद्र**–अशी आफत कुणावरही न कोसळो–**पंडित क्षीरसागर** • **नागांचा विळखा**–भारताच्या ज्वलन्त प्रश्नावरील माजी सरसेनापती **ले. ज. थोरात** यांचे मौलिक विचार याशिवाय **वसंत देशमुख** यांचे **विश्वदर्शन** शिवाय सन्मान पुष्पे, दीपमाला, रंगमंच, कै. भोबे स्मारक–निधी देणगीदारांची यादी आणि

### राजकारणातल्या नाना 'कंथा'

*** मा सि क व्यं ग चि त्र मा ला ***




★ संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४, यांनी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट येथे छापले. या प्रतीस किंमत २ रु. + रजि. पोस्ट ८० पैसे वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. प्रकाशित चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57
DIPAVALI: Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.





**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई-४

टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२-५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी रु. १६.**

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** ह्या परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# कथा आणि कंथा

**ऑगस्ट महिना! क्रांतीचा महिना. स्वराज्याचा महिना. बलिदानांचा महिना. स्वप्नांचा महिना आणि स्वप्नपूर्तीचा महिना. त्या महिन्याने लिहिल्या कितीतरी कथा. असंख्यांच्या रक्ताने लिहिल्या. हसत हसत काही फुले जळाली. त्यांच्या निर्माल्यातून फुलला अग्नी. जाळीत गेला एका साम्राज्याला आणि त्या अग्निज्वाळा भिडल्या आकाशाला. तम विरले आणि त्या ज्वाळांशी नाते सांगत उषा उगवली. तिने दिले तेज. दिला प्रकाश. दिल्या प्रेरणा. नवा इतिहास घडविण्याच्या! दिली नवी स्वप्ने. साकार करसाठी. संदेश दिला. काम करा, कष्ट करा! अखेर स्वराज्याचे सुराज्य करण्याचे दायित्व तुमचे आहे. कुणीतरी कवि म्हणाला 'गर्जा जयजयकार क्रांतिचा! गर्जा जयजयकार!!' 'अन् वज्रांचे छातीवरती घ्या झेलून प्रहार!!' लोक गरजले 'क्रांतीचा विजय असो' "इन्किलाब झिंदाबाद!" मग पुन्हा कुठून तरी शब्द आले "व्यर्थ न हो बलिदान!" साऱ्यांनी प्रतिसाद दिला "ही बलिदाने व्यर्थ होणार नाहीत. आम्ही हा ध्वज खाली पडू देणार नाही!"**

**गेली वीस वर्षे ह्या देशातली असंख्य माणसे, शासन, ह्या स्वराज्याचे, क्रांतीचे सुराज्यात रुपांतर करण्यासाठी प्रयत्नशील आहेत. येणारी उषा नवे स्वप्नही दाखवून जाते आहे, तशीच ती नवी आव्हानेही वेऊन जात आहे. क्रांतीची कथा लिहिली गेली. आजही १९६२, १९६५ ला पुन्हा नवी पाने लिहिली गेली. काही जयाची, काही पराजयाची. पण उमेद खचली नाही. आता पुन्हा संकटाचे सावट आले आहे. मित्र म्हणून ज्यांना मानले त्यांनी हात सोडवून घेतले. आहेत. रशियाने आपली भूमिका बदलली आहे. काश्मीरविषयक शंभर टक्के साथ देणारे हे राष्ट्र आज पाकच्या पाठीशी शस्त्रे घेऊन उभे आहे. ती भूमिकाही पूर्वीइतकी स्वच्छ व स्पष्ट नाही. मैत्रीच्या** गप्पाही होत आहेत आणि एकीकडे पाकला शस्त्रसज्जही केले जात आहे. चीनची शस्त्रास्त्रे व शिक्षण घेऊन नागा-मिझो अधिक धुमाकूळ घालीत आहेत. आसामही अशांत आहे. स्फोटक झाला आहे. पूर्व पाकच्या खटल्याचे निमित्त करून भारताला बदनाम करण्याची मोहीम चालू आहे. तिकडे अमेरिका, चीन, रशिया, इराणादि राष्ट्रे यांच्या सक्रिय व सशस्त्र मदतीने पाक आज पुन्हा शस्त्रसज्ज झाले आहे. अंतर्गत वातावरणही दूषित झाले आहे. अस्थिर शासन (प्रांतीय) राजकीय सौदेबाजी, जातीय दंग्यांचे उद्रेक, त्यातून पसरलेली अस्थिरतेची व असुरक्षिततेची भावना. बहुसंख्य असूनही सतत मार (दुहेरी) खावा लागत असल्याने पसरणारा असंतोष ह्या साऱ्या घटना नवी आव्हाने देत आहेत. ह्या वाहणाऱ्या जखमा एकच संदेश देत आहेत. ठामपणे उभे रहा. एकोप्याने उभे रहा. निश्चय हवा. कठोर कर्तव्यपालन हवे. हे आव्हान एकेरी नाही. शासनालाही आहे. जनतेलाही आहे. शासनही दुबळे असेल. जनताही दुर्बल असेल तर अशा राज्याचे संरक्षण परमेश्वरही करू शकणार नाही. 'स्वयमेवमृगेंद्रता' हीच खरी स्वाभिमानी भूमिका. रशिया, अमेरिका, फ्रान्स ह्या साऱ्या राष्ट्रांचे इतिहास हेच सांगतात. रशियाच्या नव्या पवित्र्याने तर आपण अधिक वास्तववादी भूमिका घेण्याची गरज उत्पन्न झाली आहे. परवा उपपंतप्रधान हेच म्हणाले. "मग घ्या की!" असे आपण सारे म्हणू या. दुसरे तरी आपण काय म्हणणार? आणि करणार? गेल्या वीस वर्षातली आपली सारी राजनीति स्वप्नरंजनवादी होती. त्यातून भ्रमनिरास होत गेले. ताजा भ्रमनिरास तरी तीच ती कथा बदलण्याचे कामी उपयुक्त ठरो. म्हणजे मग कंथा सरतील. व्यथा उरणार नाहीत. क्रांतीच्या प्रारंभकाळी व आगमनकाली झालेली बलिदाने व्यर्थ ठरणार नाहीत. आणि मग आम्ही ह्या क्रांतीच्या महिन्यात मुक्त मनाने म्हणू शकू "गर्जा जयजयकार क्रांतिचा

गर्जा जयजयकार!!

इन्किलाब झिंदाबाद!

क्रांति चिरायु होवो."

—संपादक



अनुक्रमणिका








# उत्तुंग प्रतिभेच्या बळावर अष्टपैलू कर्तृत्वाचा ताजमहाल उभारणारे

# आचार्य अत्रे



—अरविंद ताटके

**असामान्य** कर्तृत्व गाजविणाऱ्या महाराष्ट्रातल्या पुरुषांची यादी करण्याची कल्पना कुणी काढली तर आचार्य अत्र्यांचा तीत समावेश केल्याखेरीज ती यादी काही पुरी होणार नाही. पन्नास वर्षांपूर्वी अशी एक यादी इतिहासाचार्य राजवाड्यांनी केली होती. प्रत्येक क्षेत्रात पराक्रम गाजविणाऱ्या व्यक्तीचा समावेश त्यांनी तीत केला. नवी यादी करण्याच्या कल्पनेत, अत्र्यांचा समावेश करताना त्यांच्या विविध क्षेत्रातल्या नेत्रदीपक यशाचा उल्लेख करावा लागेल हे त्यांचे एक वैशिष्टय म्हणून सांगता येईल. मिडास राजाप्रमाणे ज्या ज्या क्षेत्राला त्यांनी स्पर्श केला त्यात त्यांना सोन्यासारखे यश लाभले ही गोष्ट सर्वश्रुतच आहे.

'साष्टांग नमस्कार' नाटक (१० मे १९३३) रंगभूमीवर आल्यापासून गेली पस्तीस वर्षे अत्र्यांच्या कर्तृत्वाचा चौघडा महाराष्ट्रात सदैव झडत राहीला आहे. ही गोष्ट त्यांच्या टीकाकारांनाही मान्य करावीच लागेल. सर्वसामान्य रसिक अन् गुणांची पारख असणारे लोक अत्र्यांची दीर्घकाळ टिकलेली लोकप्रियता मोकळ्या मनाने, खुल्या दिलाने कबूल करतील. लोकप्रियता मिळवून ती दीर्घ काळ टिकविणे ही गोष्ट महाराष्ट्रात तरी वाळूचे तेल काढण्याइतकी अवघड आहे. ही कठीण किमया बऱ्याच प्रमाणात अत्र्यांनी यशस्वी केली ही गोष्ट नाकारून चालणार नाही. 'साष्टांग नमस्कार' नाटकानंतर त्यांच्या गळयात लोकप्रियतेची माळ एकदा जी पडली तिचा सुगंध अजूनही टिकून राहीला आहे. त्यांच्यावर टीकाही काही कमी झाल्या नाहीत. पण म्हणून काही त्यांच्या लोकप्रियतेचा बहर ओसरलेला नाही. 'साष्टांग नमस्कार'ला जशी गर्दी झाली तसेच भाग्य त्यांच्या आजच्या नवीन 'प्रीतिसंगम' नाटकालाही लाभत आहे. आमच्या श्री. माधव मनोहरनी या नाटकावर, पर्यायाने अत्र्यांवर टीकेचा बडगा उभारूनही पाहिला. पण छे ! प्रेक्षक त्यांच्यावर, या नव्या नाटकावर खरोखरी फीदा आहेत नि चवीने अन् उत्सुकतेने हे नाटक पहाण्यास एकच झुंबड उडत आहे. त्यांच्या 'मराठा'मधील अग्रलेखांवर अजूनही वाचकांच्या उड्या (अत्र्यांना शिव्या देणारेही अग्रलेख मुद्दाम वाचण्यास चुकत नाहीत) पडत आहेत. त्यांच्या 'कऱ्हेचे पाणी' या आत्मचरित्राचे खंड मिळविण्यासाठी ग्रंथालयात 'क्यू' लागत आहे अन् मोठ्या व्यक्तीचे निधन झाले की 'मराठा'तला मृत्युलेख वाचण्यासाठी वाचकांची उत्कंठा शिगेस पोहोचत आहे. यात अतिशयोक्ती सुतराम् नाही. अत्र्यांच्या व्यक्तीमत्वाचाच हा सारा खेळ आहे, प्रभाव आहे.



अत्र्यांच्या उत्साहाला तर धरबंदच नाही. आयुष्याच्या उतरणीवर असतानाही 'तो मी नव्हेच' 'डॉ. लागू' अन् 'प्रीतीसंगम' सारखी अप्रतिम नाटके ते लिहीतच आहेत, वृत्तपत्राच्या दैनंदिन रगाड्यातही ते दंग आहेत, सवाई गंधर्वांच्या पुतळ्याच्या अनावरण समारंभास










ते आपल्या आवडत्या पुण्याकडे कूच करीत आहेत अन् बालगंधर्व नाटच मंदिराच्या समारंभाचे अध्यक्षपदही त्यानाच लाभलेले होते. पण प्रकृती अस्वास्थ्यामुळे ते पुण्यास जाऊ शकले नाहीत. त्यांचे अध्यक्षीय भाषण पुण्याचे महापौर ना. ग. गोरे यानी वाचून दाखविले. प्रत्येक आठवडचास त्यांच्या आत्मचरित्राची प्रकरणे चालूच आहेत अन् ग्रंथपरीक्षणे करण्याचा सपाटाही त्यानी चालू ठेविलेला आहे. सत्तरीतही त्यांचा उरक जबरदस्त आहे अन् त्यांच्या लेखनाचा झपाटाही तरुण लेखकाला लाजवील असाच आहे. सत्तरीचा उंबरठा ते ओलांडणार आहेत ही गोष्ट गणित-शास्त्रावरून ठरवायची खरी. पण त्यांची प्रतिभा आजही प्राजक्ताच्या फुलांसारखी प्रसन्न अन् टवटवीत आहे. शरीर थोडेबहुत थकले असेलही. पण त्यांचे मन खरोखरीच चिरतरुण आहे. नेहरू वारले तेव्हा ते आजारी होते, पण तरीही त्यानी 'मराठा'त त्यांच्या-वर सतरा लेख इतके अत्युत्तम लिहिले की, श्री. हरीभाऊ मोटचांना ते 'सूर्यास्त' हे नांव देऊन पुस्तक रूपाने काढण्याचा मोह काही आवरला नाही. नेहरूंवर इतके प्रसन्न लेखन अत्र्यांखेरीज मराठीत कुणीही केलेले नाही. त्यांच्या प्रतिभेची भरारी अन् मनाचा भाव-स्पर्शीपणा या पुस्तकात पहावयास मिळतो. अशा या प्रतिभावान अत्र्यांवर लिहिणे म्हणजे तारेवरची कसरत. अनेकानी त्यांच्यावर लिहिले आहे अन् त्यानीहि स्वतःविषयी पुष्कळच लिहून ठेवले आहे. पण अनेकानी लिहावे इतके त्यांचे व्यक्तीमत्व संपन्न असल्याने मला या प्रसंगी त्यांच्या विषयींच्या माझ्या भावना प्रकट करण्यास मोठी धन्यता वाटत आहे.

**पराक्रमाचा वारसा**

अत्र्यांचे पूर्वज राघो बल्लाळ अत्रे यांनी शिवाजीच्या काळात तलवार गाजविलेली होती. त्यांच्या शौर्याचा अन् पराक्रमाचा वारसा त्यांचे वंशज असलेल्या प्रल्हाद केशव अत्र्यांच्यात आलेला आहे. घरची गरीबी अन् वडीलही लौकर गेले तरी अत्रे काही डगमगले नाहीत. बी. ए. झाल्यावर त्यानी शिक्षणक्षेत्रात उडी घेऊन कॅम्प एज्युकेशन सोसायटीची सूत्रे त्यानी आपल्या हाती घेतली. आयुष्यात त्यानी कधी कुणाचे दुय्यमपण पत्करले नाही. ते पत्रकार झाले ते स्वतः साप्ताहिक काढून अन् संपादक झाले तेही स्वतः 'मराठा' काढून. असो. 'झेंडूची फुले' लिहून विडंबन काव्याचा नवीन प्रकार त्यानी मराठीत रूढ केला. त्यांचे परात्पर गुरु विनोदाचार्य श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीही तेव्हा त्याना शाबासकी दिली. गडकऱ्यांचा सहवास त्यांना चार पाच वर्षे लाभला. आपल्या या गुरूचे ऋण आजही अत्रे मोठचा कृतज्ञतेने मानतात. त्यांच्या वाङ्मया-वर गडकऱ्यांची छाप अधून मधून दिसत असली तरी त्यांची शैली स्वतःची अन् वेगळीच आहे. पुढे ते विलायतेला जाऊन टी. डी. होऊन आल्यावर शिक्षणक्षेत्रात त्यानी कमालीचा लौकिक मिळविला. 'साष्टांग नमस्कार' नाटकाने त्याना नाटककार बन-विले. पुणे नगरपालिकेत निवडून आल्यावर सार्वजनिक क्षेत्रात ते पडले अन् 'नवयुग'ची नौबत महाराष्ट्रात झडू लागल्यावर तेजस्वी पत्रकारात त्यांची गणना होऊ लागली. मराठी साहित्य संमेलन, नाटचसंमेलन अन् पत्रकार परिषद या तिहींचे अध्यक्षपद भूषवि-णारे ते एकुलते एक साहित्यिक आहेत. रंगभूमी त्यांनी गाजविली तशी चित्रपटसृष्टीही गाजविली. त्यांच्या 'श्यामची आई'ने त्याना राष्ट्रपति पदक मिळवून दिले. संयुक्त महाराष्ट्राच्या लढचात त्यांनी वाणीचा उपयोग दांडपट्टचासारखा केला तर लेखणीचा उपयोग लाठीसारखा केला. साठीच्या आसपास आल्यावर 'मराठा' पत्र काढून त्यानी एक चमत्कारच केला. विधानसभेत ते चमकले. पण लोकसभेसाठी झालेल्या निवडणुकीत त्यांना यश लाभलं नाही. ते लाभते तर तात्यासाहेब केळकरांसारखी दिल्लीहून उत्कृष्ट वार्तापत्रे 'मराठा'त प्रसिद्ध करून दिल्लीतल्या अनेक घटनांचा अन् घडामोडींचा त्यानी दंभस्फोट केला असता. जे जे कार्य त्यानी हाती घेतले त्यासाठी त्यानी सर्वस्व वेचले. यशाने ते हुरळले नाहीत अन् पराभवाने कधी खचले नाहीत. गेले एक तप त्यांचा 'मराठा' महाराष्ट्रात गाजत आहे. आता ते त्यात स्थिरावले आहेत, रमले आहेत. त्यांचे नाटचलेखन धडाक्याने चालू असून स्वतःच्या अत्रे थिएटर्सतर्फेच ते आपली नाटके आता महाराष्ट्राला सादर करीत आहेत. त्यांचे सारे चरित्र म्हणजेच एक चमत्कार आहे. धडपडणारे

**१३ ऑगस्टला आचार्य अत्रे एक्काहत्तरीत प्रवेश करीत आहेत. त्याप्रीत्यर्थ त्यांचे हे आगळे, वेगळे, रसरशीत पण चिकित्सकपणे रेखाटलेले व्यक्तिचित्र रसिक वाचकाना खास आवडेल.**

प्राणी अनेक असतात. पण धडपड करीत असताना प्रत्येक क्षेत्रात असामान्य यश मिळविणारे आचार्य अत्रे महाराष्ट्रात तरी एकटेच आहेत यात दुमत होऊ नये.

फाळणी होऊ नये म्हणून अत्र्यानी जो प्रभावी प्रचार केला त्याचे अनेकाना आज विस्मरण झालेले दिसते. काँग्रेस नेत्यानी देशाची शकले करून स्वराज्य पत्करले ही गोष्ट त्याना मान्य नव्हती. 'नवयुग'मध्ये त्यानी फाळणीविरोधी प्रचार अगदी धुमधडाक्याने केला. मनातून फाळणी अनेकाना मान्य नव्हती. पण मुंबईच्या मराठी पत्रकारांपैकी तरी अत्र्यांच्या इतका फाळणीविरोधी प्रभावी प्रचार कुणीही केला नाही. फाळणी अन्यायकारक आहे ही गोष्ट मनाला पटल्यावर त्यानी लेखणीचा पट्टा असा काही फिरविला की त्यामुळे तेव्हा अनेकानी त्याना जातीयवादी ठरविले, हिंसावादी म्हटले, पण आपल्या मतापासून ते जराही ढळले नाहीत. ज्या कारणासाठी अत्रे मला अतिशय आवडतात त्यातले एक कारण त्यानी फाळणीला केलेला कडाडून विरोध हे सांगता येईल. स्वा. सावरकरानी आपल्या प्रत्येक भाषणात फाळणीचा संभाव्य धोका आधीच स्पष्ट केला होता. नंतर अत्र्यानी फाळणी विरोधासाठी आपली सारी शक्ती खर्च केली म्हणूनच त्यांचे सावरकरांशी दुरावलेले संबंध पुन्हा दृढ झाले असावेत. अत्र्यांच्या तोडीचा प्रभावी प्रचारक महाराष्ट्रात दुसरा नाही याची ग्वाही त्यांच्या फाळणीविरोधी प्रचाराच्या वेळीच दिसून आली अन् त्यांच्या खऱ्या देशभक्तीचा अन् देशप्रेमाचा झरा कसा एखाद्या गिरसप्प्यांसारखा खळाळणारा आहे याचीही छान कल्पना सूज्ञांना आली. संयुक्त महाराष्ट्राच्या वेळी त्यानी जो तूफान प्रचार केला त्याची चुणूक त्यानी फाळणी निषेधाच्या प्रचाराच्या वेळी 'नवयुग'मधून दाखविली होती. आज 'कम्युनिस्टांचे सहप्रवासी' म्हणून त्यांची खोटी हेटाळणी करणाऱ्या त्यांच्या निंदकासाठी ही जुनी गोष्ट मुद्दाम सांगितली.

अत्र्यांचे सारे कर्तृत्व अशांततेच्या काळातच खुलते, फुलते. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीच्या यशाचा सिंहाचा वाटा त्यांचाच आहे. अनेक पत्रकारानी त्यावेळी बोटचेपे धोरण स्वीकारले पण अत्र्यानी काही आपले इमान सोडले नाही. इब्राहिमखान गारद्याप्रमाणे प्रचाराची आग ते सारखी ओकीतच होते. आपद्धर्म म्हणून त्याना त्यावेळी अनेकाना दुखवावे लागले. पण त्यांच्या



नुकतेच रशियाने पाकला शस्त्रास्त्रे देण्याचे ठरविले आहे.

अंतरीची तळमळ संयुक्त महाराष्ट्र 'याचि देहा याचि डोळा' पहावयास मिळावा अशी होती म्हणूनच प्रचाराचे शिवधनुष्य त्यानी एकट्याने उचलले अन् ते यशस्वीपणे पेललेही.

## हितशत्रूंकडून खोटे आरोप

पण काय गंमत पहा. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर मात्र अत्र्यांवर अनेकानी दुगाण्या झाडण्याचा अश्लाघ्य प्रयत्न केला. अत्रे त्यावेळी आर्थिक संकटात होते नि संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही त्यांना आयती पर्वणी लाभली असे एका पक्षाचे म्हणणे. या मतात अत्रेद्वेषच दिसतो. पैसे मिळविण्यास अत्र्यांना नाटके उपयोगी पडली नसती काय ? त्यांच्यावर तेव्हा कौटुंबिक जबाबदाऱ्याही फारशा नव्हत्या. मुली सुस्थळी पडलेल्या होत्या. घरी काय अत्रे अन् सुधाताई एवढाच परिवार. त्यासाठी शरीराचा अन् वेळेचा एवढा खरारा करण्याची काही त्यांना जरूरी नव्हती. 'वसंतसेने'मुळे झालेले कर्ज त्यांच्यासारख्या हरहुन्नरी माणसाला सहज फेडता आले असते. पण साहित्यिक असूनही संयुक्त महाराष्ट्रासाठी त्यानी आपली लेखणी निष्ठेने राबवली या गोष्टीचा त्यांच्या हितशत्रूंना नेहमीच विसर पडत असल्याने अत्र्यांवर खोटे-नाटे आरोप करून त्यांच्यावर चिखलफेक करण्याचा धंदा ते करीत असतात. 'मराठा' काढण्यास कॉ. डांगे यांनी, अन् रशियाने त्याना पैसा पुरविला अशी गप्पही नेहमी ऐकू येते, अन् ते छुपे कम्युनिस्ट असल्याच्या भूमिका त्यांचे हितशत्रू नेहमी उठवीत असतात. बहुतेक सगळ्या मध्यमवर्गीय समाजाला साम्यवादाविषयी (साम्यवादी पक्षाविषयी नव्हे) जसे एक प्रकारचे आकर्षण वाटते तसे फार तर अत्र्याना वाटत असेलही. नेहरूनाही तसे आकर्षण होते अन् अमेरिकेत तर ते कम्युनिस्ट असल्याचा बोभाटा होता. अत्रे कम्युनिस्ट, तर नेहरूनाही कम्युनिस्ट म्हणावे लागेल. पण अत्र्यांवर हा आरोप करताना नेहरूंवर तसा छाप मारण्याची कुणाची प्राज्ञा होत नाही. वैयक्तिक स्नेही म्हणून त्याना कॉ. डांगे यानी काही मदत केली असेलही ; पण त्याचा अर्थ असा नव्हे की ते कम्युनिस्ट झाले. कॉ. डांगे यांनी संभाजीकर्ते वा. सि. बेंद्रे यांनाही एक टाईपरायटर भेट दिला होता. मग बेंद्रे यांनाही कम्युनिस्ट म्हणायचे की काय ? अत्रे यानी अनेक पक्ष बदलले असतील. पण ते ज्या ज्या पक्षात होते त्याचा टिळा त्यानी उघडपणे लावला होता. ते खरोखरीच कम्युनिस्ट




झालेले असते तर 'आम्ही कम्युनिस्ट आहोत' असे निर्भयपणे अग्रलेखात जाहीर करण्याचे धैर्य त्यांच्यामध्ये निश्चित आहे. ज्यानी अत्र्यांचे सारे चरित्र मर्मज्ञपणे पाहिले आहे त्यांना स्वतंत्र प्रकृतीचे अत्रे कम्युनिस्टांसारख्या करड्या पक्षाच्या शिस्तीचे जूं मानेवर घेतील, ही गोष्ट कधीच पटणार नाही. 'मराठा'साठी 'बँक ऑफ महाराष्ट्रा'-कडून कर्ज घेतले असल्याची वस्तुस्थिती अत्र्याना रशियाने पैसा पुरविला असा खोटा आरोप करणाऱ्या त्यांच्या शत्रूना निश्चित माहीत आहे. तरी लोकांचा बुद्धिभेद व्हावा म्हणून असले शिवराळ अन् विनबुडाचे आरोप ते अत्र्यांवर सतत करीत असतात. रशियाने अगर डांग्यांनी अत्र्यांना पैसे पुरविल्याचा लेखी पुरावा दुरान्वयानेही त्यांच्या शत्रूपक्षाला जोपर्यंत दाखविता आलेला नाही तोपर्यंत हे सगळे आरोप निखालस खोटे अन् मत्सरबुद्धीने केलेले आहेत असेच म्हणणे प्राप्त आहे.

**विलोभनीय भाषावैभव**

अत्र्यांचे भाषावैभव अतिशय विलोभनीय आहे. त्यांच्या भाषेचा मराठमोळा थाट वाचकांवर भुरळ पाडतो अन् म्हणूनच त्यांचे अग्रलेख अन् मृत्युलेख अत्यन्त उत्कंठतेने वाचले जातात. मात्र काही काही वेळा त्यांचा संयम सुटतो अन् ते विवेकाला पारखे होतात असे दिसते. टीकेच्या नादात म्हणा अगर रागाच्या भरात म्हणा ते असे काही लिहून जातात की अनेक मांणसे त्यामुळे दुखावतात. मागे ना. ग. गोऱ्यांवर टीका करताना अग्रलेखात त्यांच्या बायकोला मी नोकरी लावून दिली तरी त्यांनी मला त्याची ओळख दिली नाही अशा अर्थाचे एक वाक्य ते सहज लिहून गेले. गोऱ्यांवर हवी तर त्यांनी जरूर प्रखर टीका करायची पण त्यासाठी त्यांनी सौ. सुमतीबाईनाही (गोऱ्यांच्या पत्नी) भरीस घातले ही गोष्ट अनुचित म्हटली पाहिजे. अर्थात गोऱ्यांच्या एकसष्ठीच्या वेळी त्यांनी त्यांच्यावर गौरवपर अग्रलेख लिहिण्याचे औदार्य दाखविले ही गोष्ट अत्र्यांच्या मोठेपणाची म्हणून सांगता येईल. ना. भि. परुळेकरांवर ('सकाळ'च्या) टीका करतांना अत्र्यांनी त्यांच्या पत्नीसंबंधात नकळतपणे स्वर्गस्थ बा. शि. मुंज्यांना ओढून मोठाच प्रमाद केला. त्यांना ही काय गोष्ट समजली नसेल ? पण टीकेच्या धुमाळीत त्यांचे तारतम्य सुटते हेच खरे. सावरकरांच्या निधनोत्तर दुसऱ्या दिवशीच्या अग्रलेखात 'त्यांची नाटके भिकार होती' असे लिहून ते मोकळे झाले. औचित्यभंगाची ही चूक त्यांनी कां केली समजत नाही. 'महाराष्ट्र टाइम्स'चे भूतपूर्व संपादक द्वा. भ. कर्णिक यांच्यावरही त्यांनी असाच अप्रयोजक अग्रलेख लिहिला. अगदी अलीकडे 'माधव ज्युलियन' चरित्राचे ग्रंथकार गं. दे. खानोलकर यांच्या भाषेबद्दल त्यांना जाहीर फटके मारावेत अशी शिक्षा देऊन अत्रे मोकळे झाले. ही भाषा अत्र्यांसारख्या प्रतिभावंतास कमीपणा आणणारी आहे असे मला वाटते. पण लिहिण्याचे बाबतीत त्यांना संयम अन् विवेक पहिल्यापासूनच नसावा असे दिसते. सावरकरांवरील टीका, केळकरांवरील टीका अन् 'सत्तावनचे शिपाई गर्दी' ग्रंथाबद्दल फाटकांना 'नराधम' हा आहेर दिला तेव्हा अत्र्यांच्या लेखणीचा तोल ढासळलाच होता. पण तेव्हा हिंदुसभीय मंडळींवर व फाटकांसारख्या अप्रिय ग्रंथकारावर ते टीका करीत होते म्हणून कॉंग्रेसपक्षीय काय अगर आमचे प्र. समाजवादी काय अत्र्यांच्या लेखणीचे सारे खेळ मजेत पहात होते. पण त्यांच्यावरच जेव्हा अत्र्यांनी टीकेचे अस्त्र सोडले तेव्हाच त्यांना अत्र्यांना संयम अन् विवेक नसल्याचा साक्षात्कार झाला हीदेखील एक गंमतीचीच गोष्ट म्हटली पाहिजे. अत्र्यानी कडक टीका हवी तेवढी करावी पण त्यानी सद्‌भिरुची सोडू नये असेच त्यांच्या चहात्यांना नेहमी वाटते. संयम सोडून ते काही वेळा लिहितात तरी अन् एकेका मुद्याला उत्तर देण्याची प्रथा ते नेहमी टाळीत आले असले तरी भारदस्त टीका त्यांना करता येत नाही असा त्याचा अर्थ नव्हे. मागे 'नवयुग'च्या दिवाळी अंकात म. गांधींच्या ब्रह्मचर्याचा दंभस्फोट त्यांनी ज्या एका लेखात केला तो लेख त्यांच्या टीकेचा उत्कृष्ट नमुना म्हणून दाखविता येईल. अलीकडे समग्र गडकरी वाङ्मयाला त्यांनी लिहिलेली सुमारे एकशेसाठ पृष्ठांची प्रस्तावना ही मराठी टीका वाङ्मयाची भूषण ठरावी इतकी अप्रतिम आहे. त्यांच्या लेखणीत इतकी विवेचक अन् वैचारिक टीका करण्याचे सामर्थ्य आहे म्हणूनच त्यानी काही व्यक्तींवर टीका करताना विवेक सोडू नये अशीच इच्छा त्यांच्याबद्दल आदरभाव बाळगणाऱ्यांची असते. त्यांच्यासारख्या प्रतिभा-

वान अन् सिद्धहस्त लेखकाच्या लेखणीचा ताल अन् तोल सदैव सम अन् संयमपूर्ण रहावा अशीच त्यांच्या चहात्यांची अपेक्षा असते.

पूर्वी महाराष्ट्रात तरी राजकारणी मंडळीना साहित्यिक, राजकारणापासून अलिप्त असतात म्हणून वैषम्य वाटे. पण जेव्हा का अत्रे प्रत्यक्ष राजकारणात पडले तेव्हा ती गोष्ट अनेकांना आवडली नाही. साने गुरुजींचे साहित्य अनेकाना आवडे पण त्यांच्या राजकारणाला नाके मुरडणारे अनेक महाभाग निघाले. अत्र्यांचे तसेच झाले. तशात त्यानी अनेक पक्षात स्थित्यंतरे केल्यामुळे विचारवंताना त्यांचा विश्वास वाटेना. सार्वजनिक कार्य जोमाने करता यावे म्हणूनच अत्र्यांनी १९३८ साली काँग्रेस प्रवेश केला तरी त्यांचा पिंड काँग्रेसशी मिळता जुळता नव्हता ही गोष्ट फाळणीच्या वेळी सिद्ध झाली. म्हणून ते प्रथमपासून स्वा. सावरकरांना धरून राहते तर त्यांच्या राजकीय तत्वनिष्ठेबद्दल अनेकांना जी साशंकता वाटते ती वाटली नसती. पण अत्रे ज्या ज्या पक्षात गेले तिथे ते स्वयंप्रकाशी म्हणूनच गेले अन् त्यांच्या लोकप्रियतेचा फायदा त्या त्या पक्षाला भरपूर मिळाला ही गोष्ट त्या पक्षातली मंडळी आता सोयीस्करपणे विसरली असली तरी ती वस्तुस्थिती त्याना डावलता येणारी नाही. आज अत्रे समितीत असले तरी ते कुठल्याच पक्षात नाहीत ही गोष्ट एकपरी बरीच आहे. स्वतंत्रतेच्या गगनातच विहार करणाऱ्या अत्र्यांसारख्या स्वयंप्रज्ञ गरुडाला पक्षीय तटबंदी मानवणारी नाही. त्यांचे आतापर्यंतचे राजकारण कुणाला आवडो अगर न आवडो पण पुढे जेव्हा एखादा निःपक्षपाती इतिहासकार (सरकार दरबारचा भाट नव्हे) महाराष्ट्राचा इतिहास लिहावयास बसेल तेव्हा अत्र्यांच्या संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीच्या वेळच्या कर्तृत्वाचा इतिहास त्याला सुवर्णाक्षरातच लिहावा लागेल यात शंका नाही.

अत्र्यांचे वैभव, त्यांचे कर्तृत्व, त्यांना अनेक वर्षे लाभलेली लोकप्रियता, त्यांच्या नाटकाना लाभलेले यश अन् त्याना मिळालेला पैसा नि त्यांच्या 'मराठा'चा शुक्लेंदुवत वाढणारा उत्कर्ष वगैरे गोष्टी आमच्याकडे अनेकांच्या मत्सरास पात्र ठरल्या ही गोष्टही सांगणे भाग आहे. महाराष्ट्राला नाहीतरी गुणग्राहकतेचे थोडेसे वावडेच आहे. लो. टिळकांनाही शिव्या देणारे शत्रू पुण्यात होतेच अन् त्यांचाही खुद्द पुण्यात अपमान करण्यात आनंद मानणारी मंडळी पुण्यात होती ही गोष्ट विसरून कसे चालेल ? साने गुरुजींची अन् सावरकरांची उपेक्षा काय आमच्याकडे कमी झाली ? एवढी उपेक्षा अत्र्यांच्या वाट्यास आली नाही तरी त्यांचे अकारण शत्रूत्व धरणारी मंडळी आपल्याकडे बरीच आहेत. टीकेच्या भरात अत्र्यांनी अनेकांना दुखविले हे खरे असले तरी त्यांच्या 'नवयुग'ने अनेकांच्या ओव्या गाण्यासाठी खास अंक अन् गौरवअंकही किती काढले ते पाहिले तर अत्र्यानी नुसते शिव्यांचे राजकारण केले ही त्यांच्या शत्रूंची आवडती कुत्तेभुंक पार खोटी पडते. जाता जाता त्यांच्या टीकाकारांविषयी लिहिणेहि टाळता येणारे नाही. प्रबोधनकार ठाकऱ्यांशी जरी त्यांचे आता बिनसले असले तरी उभयतांचा स्नेह अनेक वर्षे होता. अत्र्यांच्या गौरवग्रंथात (१९५८) ज्यांनी ठाकऱ्यांचा लेख पाहिला असेल त्यांना त्यांचा अत्र्यांविषयींचा जिव्हाळा समजून येईल. खाजगी कारणांवरून उभयतांचा स्नेह दुरावला अन् मग दोघांत वादाची खणाखणी झाली. श्री. बाळ ठाकऱ्यांनी अत्र्यांवर वेगवेगळी व्यंगचित्रे काढून घणाघाती टीकाही केली. प्रबोधनकारांचे त्यांचे राजकीय मतभेद होते तर ते पुरवले असते पण स्नेह तुटावयास नको होता असेच मला वाटते. तरीहि प्रबोधनकारांच्या मनात कुठेतरी अत्र्यांबद्दल जिव्हाळाच असेल याची खात्री मला वाटते. श्री. बाळ ठाकऱ्यांच्या चित्रकलेचा उपयोग 'नवयुग'च्या उत्कर्षास झाल्याची जाहीर कबुली अत्र्यांनी अलिकडेच (मराठा, १६ जून १९६८) दिली आहे. श्री. चं. वि. बावडेकर हे अत्र्यांचे दुसरे टीकाकार. 'आलमगीर' निघाला तेव्हा त्यांचे अत्र्यांशी थोडेबहुत बरे असावे. पण विविधवृत्तात अत्र्यांवर टीका येतच होती तेव्हा उभयतांचा स्नेह होता असे काही म्हणता येणार नाही. अत्र्यांनी मराठाच्या एका अग्रलेखात बावडेकरांवर टीका केली अन् मग उभयतांचे युद्ध जुंपले. अत्र्यांवर जास्त टीका नंतर आलमगीरातच येऊ लागली. बावडेकर कलमबहाद्दर खरे पण पुढे त्यांच्याही लेखणीचा संयम गेला असेच म्हणावे लागते. संयम नाही म्हणून अत्र्यांवर टीका करायची अन् ती करताना आपण संयम सोडायचा याची संगती कशी लावायची ? अत्र्यांनी वीस वर्षे 'नवयुग' उत्तम प्रकारे चालवून महाराष्ट्राची बरीवाईट सेवा केली. फाळणीचा अन्याय त्यानी वेशीवर टाकण्याचा प्रयत्न मनोभावे केला. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीतला त्यांचा भीम पराक्रम सूर्यप्रकाशासारखा स्वच्छच आहे. 'मराठा'ही त्यानी एक तप उत्तम प्रकारे चालविलाच. सार्वजनिक कार्याचा त्यांचा झपाटा सर्वानाच ठाऊक आहे. या सगळ्या बाबतीत समर्थांचा पुढील इशारा अत्र्यांनी ध्यानात ठेवण्यासारखा आहे–

धाकुटा भाग्यासी चढला । तरी तुच्छ मानिती तयाला
तया कारणे सलगीच्या लोकाला । दूरी धरावे ।।

## झुंझार पत्रकार नि साहित्यिक

असो. अत्र्यांविषयी आणखी पुष्कळच लिहिता येईल. लेखाच्या विस्ताराला मर्यादाही घातलीच पाहिजे. सगळे व्याप सांभाळीत असतांना अत्र्यांनी वाङ्मयाची संगत अन् सोबत कधी सोडली नाही हे त्यांचे खास वैशिष्ट्य. काव्य, कथा, चरित्रे, नाटके, आत्मचरित्र अन् विविध वाङ्मय प्रकारांनी त्यांचा साहित्यसंसार चांगलाच समृद्ध आहे. पुष्कळ मंडळी 'अत्रे साहित्यिक म्हणून आम्हाला आवडतात' असे शहाजोगपणे सांगताना आढळतात. साहित्यिक महाराष्ट्रात सुकाळाचे आहेत अन् पुढेही होतील. पण अन्याय दूर व्हावा म्हणून सार्वजनिक प्रश्नांसाठी, दया माया न ठेवता निर्भयपणे सरकारवरही कठोर टीका करून आपली लेखणी जवळ जवळ २८ वर्षे सार्वजनिक प्रश्नांसाठी सतत राबविणारा त्यांच्यासारखा झुंजार साहित्यिक आजघडीला तरी आपल्याकडे दुसरा नाही हेच अशा

( पान ६६ वर पहा )

एक प्रदीर्घ शृंगारकथा

# आता जिथे ताजीवाले

**—श्रीधर घैसास**



**बरंय** साहेब. . . .भेटूया लवकरच परत. . . . असाच योग पुढील वर्षीही येऊ दे हीच इच्छा आहे. सरपोतदार हात जोडीत भक्तिभावनेनं म्हणाले.

तुमच्या सदिच्छा माझ्यामागं आहेत. आणि काय हवंय माझ्यासारख्याला ? साहेबानी नम्रपणानं हसून सरपोत-दारांचा हात प्रेमभरानं धरला आणि मनगटावरील घड्याळाकडे पाहिलं. आता फक्त एकच मिनीट उरलं होतं गाडी सुटायला.

तोच गर्दीतून वाट काढीत "जीओ बेटा—जीओ" असं कापऱ्या आवाजात म्हणत म्हणत शर्माजी पुढं सरसावले आणि मोठ्या प्रेमानं साहेबांच्या पाठीवर त्यांनी हात फिरविला आणि पाठ थोपटली.

"दुवा माँगता हूँ चाचाजी" असं म्हणत साहेबानी शर्माजींच्या पावलाला हात लावला. गहिवरून शर्माजीनी एकदा आकाशाकडे बोट केलं आणि आशिर्वाद दिल्यासारखे दोन्ही हात साहेबांच्या डोक्यावर धरले. साहेबाना धन्य झाल्यासारखं वाटलं.

"पुढच्या वेळेला दिल्लीत आलात की आमच्याकडेच उतरायचं बरं का ? मिसेस् कर्वे साहेबांच्याकडे पाहून गोड हसत म्हणाल्या आणि त्यानी साहेबांकडे साभिप्राय पाहिलं.

"हो, म्हणजे आधी टेलिग्रॅमच करा की तुम्हाला रिसीव्ह करायलाच स्टेशन-वर येऊ गाडी घेऊन. . ." कर्वे झिरझिरीत साडी नेसलेल्या आपल्या सुंदर पत्नीकडे पाहात म्हणाले.

अनुक्रमणिका

***राष्ट्रपती पदक स्वीकारून साहेब आज परतत होते. कृतकृत्य झाल्यासारखे ! आता त्यानी आयुष्यात सर्व काही मिळविलं होतं....मोठ्या संतोषानं साहेबानी जडावलेले डोळे उघडले आणि घड्याळाकडे पाहिले. अकरा वाजून गेल्याचं त्याना कसंबसं जाणवलं. डब्याबाहेर मिट्ट काळोख होता. त्यानी समोर पाहिलं. सविता अजूनही काहीतरी वाचीत बसली होती. ते तसेच तिच्याकडे पहात राहिले. अतृप्तीनं—बखवखलेल्या अतृप्तीनं. . .***

---

"अवश्य कळवीन आधी" साहेब मिसेस् कर्व्यांकडे पाहात अर्थपूर्ण हसत म्हणाले. यावर त्या अधिकच गोड हसल्या. कर्वेही उगीचच हसत राहिले. आणि त्या हसण्यालाच गार्डच्या चिरपरिचित शिट्टीनं छेद दिला. . . क्षणार्धातच हात उंचावून साहेब सर्वांचा निरोप घेऊ लागले.

त्यांना हार घालण्यासाठी, जाता जाता साहेबांचं प्रेमानं अभिनंदन करून त्यांना निरोप देण्यासाठी शेकडयानी माणसं आज प्लॅटफॉर्मवर गोळा झाली होती—एखाद्या मंत्र्यालाही हेवा वाटावा अशा प्रचंड संख्येनं ! या प्रेमानं साहेब भारावून गेले होते—आश्चर्यचकीतही झाले होते. इथे या परप्रांतात – दिल्लीसारख्या ठिकाणी आपल्यावर प्रेम करणारे इतके अगणित लोक पाहून साहेबांचं मन अभिमानानं भरून आलं. त्यांना आपल्या आयुष्याचं सार्थक झाल्यासारखं वाटलं.

हात तसाच हलवीत ते आपल्या राखीव डब्यात चढले. पुन्हा एकदा चोहोकडून "क्लिक, क्लिक" असे कॅमेऱ्यांचे आवाज झाले . . . फ्लॅशेस चमकले. आणि अगदी हसतमुख चेहेऱ्यानं साहेबानी सर्वांना निरोप दिला. गाडी हलली. प्लॅटफॉर्म हळू हळू मागे पडू लागला. आता फक्त रुमालांचे ठिपके तेवढे दिसत होते. साहेबानी एकदा शेवटचा हात वर केला आणि ते डब्यात वळले. गाडीनं आता वेग घेतला होता.

हुश्श ! गळ्यातील हारांचा ढीग काढून ठेवीत साहेबानी थकलेल्या स्वरात आवाज केला. लोकांच्या या उत्स्फूर्त प्रेमानं ते गहिवरले होते. त्याना काहीतरी बोलावसं वाटत होतं पण शब्दच अडून बसले होते. शेवटी काहीच न सुचल्यामुळे फक्त हसूनच त्यानी सविताकडे पाहिलं आणि नुसतीच मान डोलावली...

"खरंच, आज उमा हवी होती हा सोहळा पाहाण्यासाठी!" सविता साहेबांकडे पाहात कौतुकानं म्हणाली.

"हं. . . . . तेही नशिबात असावं लागतं– दोघांच्याही. . ." साहेब जरासे थांबून म्हणाले. याच वेळी नेमका तिचा पाय फ्रॅक्चर व्हावा ना बाथरुममध्ये पडून ?" साहेबानी हसून विचारलं.

आज तरी त्यांना उमेची अनुपस्थिती फारच जाणवली. एवढा मोठा मानसन्मान त्यांच्या वाट्याला आला होता. देशाच्या कानाकोपऱ्यात त्यांचं नाव झालं होतं. अभिनंदनाच्या अनेक तारा, असंख्य पत्रं साहेबाना आली होती आणि अजूनही येतच होती. उत्कृष्ट चित्रपट निर्माण केल्याबद्दल या वर्षाचं राष्ट्रपतिपदक साहेबाना मिळालं होतं. राष्ट्रपतींच्या हस्ते हे पदक स्वीकारीत असतानाचे छायाचित्र सगळ्या लहान मोठ्या वर्तमानपत्रात पहिल्या पानावर झळकणार होतं. त्यांचा फोटो आणि जोडीला राजूचाही. . . . या वर्षीचा उत्कृष्ट कलावंत म्हणून ! या आठ–नऊ वर्षाच्या छोकऱ्यानं आपल्या सहजसुंदर अभिनयानं भल्याभल्याना दीपविलं होतं. अभिनयातील त्याची सहजता तर एखाद्या कसलेल्या नटालासुद्धा लाजविणारी होती. प्रेक्षक त्याच्यावर बेहद्द खूष झाले होते आणि या खुषीची पावती साहेबाना आणि राजूला चित्रपटाच्या सुवर्णमहोत्सवानंच मिळाली होती. आज तीच पावती सरकारमान्य झाली – राजमान्यतेचा शिक्का त्यावर बसला होता. साहेबांचं मन मिळालेल्या यशानं भरून राहिलं होतं आणि तरीही त्यांना ते रितं वाटत होतं ! आज तरी हे पाहायला उमा हवी होती असं त्यांना पुन्हा पुन्हा वाटत राहिलं.

पण साहेब थोडंच काही करू शकणार होते ? जे झालं त्याला साहेबांचाही इलाज नव्हता.

हं. . . . . जाऊ दे. . . . उसासा सोडून मनाची पोकळी झटकून टाकण्यासाठी साहेबानी हंसून सवितेकडे पाहिलं आणि बॅगेकडे बोट दाखविलं. सविता उठली आणि बॅग उघडून तिनं ग्लास समोर ठेवला. त्यात छोट्या 'आइस बकेट'मधले बर्फाचे खडे टाकले आणि "व्हॅट" ची बाटली साहेबांच्या हातात देऊन ती परत मासिक चाळू लागली.

मनाची पोकळी भरून काढण्याची किंवा शरीराचा व थकवा दूर करण्याचा हा साहेबांचा नेहमीचा उपाय होता. मात्र आता त्यांना मानसिक चिंता वगैरे काहीही नव्हती. उमाची अनुपस्थिती तर साहेबांनी आपल्या मनातून केव्हाच झटकून टाकली होती. आज त्यांना स्वतःलाच हे मिळालेलं यश सेलेब्रेट करावयाचं होतं ! आपल्या आनंदात कुणालाही भागीदार न करता—अगदी एकट्यानं! साहेब स्वतःशीच अगदी खुषीनं हंसले आणि हळुवारपणानं त्यांनी बर्फाच्या खड्यावर मद्य ओतण्यास सुरवात केली. जवळ जवळ आठ-दहा वर्षं तरी ते नियमानं पीत होते. प्रसिद्धी साहेबांच्या वाट्याला आली आणि त्याबरोबरच मोठेपणाच्या येणाऱ्या चिंताही साहेबांच्या मागे लागल्या. हे मोठेपण मिळविण्यासाठी साहेबानी अमाप कष्ट केले होते. आणि ते मिळविल्यावर त्याला साजेसं मोठ्या माणसाचं हे प्रतिष्ठित व्यसनही साहेबानी स्वतःला लावून घेतलं—मात्र ज्या वेळेस हे आपल्याला परवडू शकेल अशी त्यांची खात्री झाली तेव्हाच ! परंतु हे पिणं त्यांनी प्रमाणाबाहेर केव्हाच जाऊ दिलं नाही. त्यांचा याबाबतीतील संयम मोठा वाखाणण्यासारखा होता. किंबहुना त्यांचा हा संयमी स्वभाव सर्वत्र गोष्टीत दिसून येई. प्रत्येक गोष्ट त्यांनी स्वतःच्या मनावर आणि तितकाच

इतरावरही ताबा ठेवून केली, म्हणूनच एक यशस्वी माणूस म्हणून ते आयुष्यात वर चढत गेले. यशाचा कळस गाठू शकले.

आज मात्र सर्व बंधने झुगारून—सर्व संकेत मोडून आपलं हे यश साजरं करण्याचं त्यानी मनात ठरविलं होतं. "फक्त आजचाच दिवस – आज मात्र खूप प्यायचं. . . . सबंध रात्र हाताशी आहे. . . . Let us enjoy, let us celebrate. . . . साहेब खुषीत येऊन स्वतःशीच हसत म्हणाले.

एका घोटातच त्यानी मद्य घशात ओतलं आणि पुन्हा ते ग्लास भरू लागले. त्यातील बर्फाचे खडे न्याहाळीत स्वतःलाच हरवून बसले. . . . एक एक काजू चवीनं घोळवीत ते घोट घेत होते आणि ग्लासाकडे एकटक पाहात होते. आस्ते, आस्ते बेहोशी जमणार होती, धुंदी वाढणार होती आणि कैफ चढणार होता. . . स्वतःच्या आणि जगाच्याही अस्तित्वाचा विसर पाडणारा ! आज तोच साहेबांना हवा होता. त्यात आज ते स्वतःला बुडवून टाकणार होते. स्वतःसाठी आखलेले नियम साहेबांचं बंडखोर मन आज तरी मानीत नव्हतं. त्यामुळेच आज साहेबांना अगदी हलकं हलकं वाटत होतं आणि ते मोठ्या आग्रहानं स्वतःला पाजीत होते !

साहेबानी पाय पसरले आणि ते ऐसपैस मागे रेलले. ध्यानस्थ असल्यासारखे एकटक नजरेनं ते सिलींग फॅनकडे पहात बसले. पंखा गरगरत होता आणि त्याकडे पाहाता पाहाता साहेबांच्या विचारानीही गती घेतली.

स्मृतीची पानं हळुवारपणे उलगडली जात होती आणि अलिप्त-पणानं साहेब त्यात डोकावून पाहात होते. . . . . . .कुठे होतो आपण आणि कुठे पोचलो आहोत आता ? त्यांचं त्यानाच आश्चर्य वाटू लागलं.

साताऱ्याच्या अण्णासाहेब इनामदारांचे ते एकुलते एक चिरंजीव. मॅट्रिकची परीक्षा चांगल्या मार्कानं पास होऊन पुण्याला कॉलेजमध्ये दाखल झाले होते. वाचनाची मुळातच आवड होती त्याबरोबरच आता लिहिण्याचाही नाद लागला होता. अधुन मधून त्यांच्या गोष्टी मासिकात छापल्या जाऊ लागल्या आणि एक होतकरू लेखक म्हणून कॉलेजमध्ये असतानाच त्यानी नाव मिळविलं. घरी याचं कौतुक होत होतं, त्यांना उत्तेजनही मिळत होतं. एकूण ते सुखात होते. नामवंत लेखक होण्याची स्वप्नं पाहात होते, आणि एकाएकी त्यांच्यावर आपत्तीची कुऱ्हाड कोसळली. मनातल्या स्वप्नाचा चक्काचूर झाला ! कोर्टात चालू असलेला कसला तरी महत्त्वाचा दावा त्यांचे वडील हरले होते. ज्यावर त्यांची सगळी मदार अवलंबून होती ती सर्व जमीन आणि इस्टेट त्याना गहाण ठेवावी लागली होती. इनामदारांचा सारा डौल आणि वैभव क्षणार्धात् जमीनदोस्त झालं होतं. त्यांच्या वडिलानी तर एकदम हायच खाल्ली. ते भ्रमिष्ट झाले आणि त्यातच त्यांचा शेवट झाला होता. साहेबांना दुःखाचा असा फटका त्यावेळीच प्रथम जाणवला. त्या ऐन संकटाच्या वेळी त्यांना खऱ्याखुऱ्या जगाचा अनुभव आला. त्या अनुभवानंच ते पोळले गेले, दुखावले गेले; पण मन खंबीर ठेवून स्वतःला सावरूही शकले. सर्व दुःख गिळून, मान-अपमान विसरून साहेबानी नोकरी धरली आणि आईला पुण्यात आणून साहेबानी आपलं शिक्षण पूर्ण केलं. मुलाची ही ओढाताण पाहून ती माऊली मनात कुढत होती. पण साहेबानी काही झालंच नाही अशा शांत मनानं पडतील ते कष्ट उचलण्याचा चंग बांधला होता. त्यातच आपलं लिखाणही जिद्दीनं चालू ठेवलं होतं. आता तर त्यांच्या गोष्टीना अनुभवाची एक वेगळीच धार चढली होती. त्यांच्या गोष्टी नियमितपणे छापून येऊ लागल्या होत्या. हळूहळू आघा-डीच्या कथाकारात त्यांचं नाव झळकू लागलं होतं. साहेबानी पुन्हा नामवंत लेखक होण्याची जिद्द धरली होती.

आणि योगायोगानं त्यांची एक उत्कृष्ट कथा चित्रपटासाठी निवडली गेली. व्यवहाराची बोलणी झाली आणि अ‍ॅडव्हान्स म्हणून मिळालेली रक्कम मोठ्या भक्तिभावानं त्यांनी आईच्या पायाशी ठेवली. तिचा हात पाठीवर फिरला आणि साहेब कृतकृत्य झाले. त्या चित्रपटानं रौप्यमहोत्सव पाहिला आणि पहिल्याच फटक्याला साहेब यशस्वी कथालेखक म्हणून चित्रपट व्यावसायिकांच्या डोळ्यात भरले. नवीन चित्रपटासाठी कथांची मागणी एकदोन निर्माते करीत होतेच. यामुळे साहेबानी यातच लक्ष घालण्याचं ठरविलं. नवीन कथानके, नवे विषय साहेब सहजगत्या हाताळू लागले. आता त्यांच्या लिहिण्यात आत्मविश्वास आला होता. याबरोबरच त्यांनी संवाद लिहिण्याचं तंत्रही आत्मसात् केलं आणि थोडयाच वेळात उत्कृष्ट संवाद लेखक म्हणूनही त्यानी नाव कमावलं. निर्मात्यांच्या मागण्या वाढत होत्या आणि साहेब या क्षेत्रात झपा-टयाने पाय रोवीत होते. आता दिग्दर्शकाच्या खुर्चीला खुर्ची लावून ते शूटिंग चालू असताना बसू लागले. दिग्दर्शनातील बारकावे आणि खाचाखोचा अधिक बारकाईनं अभ्यासू लागले. आणि थोडयाच वेळात दिग्दर्शकाला अधुनमधून सूचना करण्यापर्यंत साहेबांची प्रगती होत गेली. त्यांच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीचा आणि बारकाईनं केलेल्या सूचनांचा दिग्दर्शक आणि निर्माते मनापासून स्वीकार करू लागले. साहेबांच्या शब्दाला वजन आलं होतं. त्यांच्या बद्दलचा निर्मात्यांचा विश्वास वाढत होता.

साहेबांची कथा लाभलेल्या एका चित्रपटाचे चित्रण चालू अस-ताना एकदा दिग्दर्शक आणि निर्माता यांच्यात मतभेद निर्माण झाला. त्या दिग्दर्शकाला कथेत काहीतरी बदल हवा होता. पण बदल केल्यावर खर्च वाढणार होता म्हणून या गोष्टीला निर्माता तयार नव्हता. साहेबानाही हा बदल इष्ट वाटत नव्हता. त्यानी सर्व परिस्थितीचा नीट अभ्यास केला, अंदाज बांधला आणि निर्मात्याची तळी उचलून धरली. अगदी छातीठोकपणानं 'आपण उरलेलं पिक्चर पूरं करू' ही गोष्ट त्यांनी निर्मात्याला पटविली. त्यांच्या कर्तृत्वाबद्दल निर्मात्याला विश्वास होताच आणि उरलेला चित्रपट साहेबानी जिद्दीनं आणि आत्मविश्वासानं पुरा केला. योगायोग म्हणजे तो चित्रपट गल्लाभरू ठरला. आणि त्यांचं नाव दिग्दर्शक म्हणूनही चमकलं. साहेब यशाची आणखी एक पायरी







चढले. स्वतःच्या कथेला अधिक न्याय मिळावा म्हणून चांगल्या कथा यापुढे शक्यतो आपणच दिग्दर्शित करण्याचा साहेबानी निश्चय केला. त्यांची 'मार्केट व्हॅल्यू' अधिकच वाढली. आता त्यांचे एकामागोमाग एक चित्रपट झळकू लागले. त्यातील काहीनी खूपच गल्ला जमवून दिला. साहेबांचं नाव गाजत होतं. साहेब आता मोठे झाले होते.

या मोठेपणाबरोबरच चित्रपटात काम करण्यास उत्सुक असलेल्या – किंवा सिनेतारका होण्याची स्वप्नं पाहाणाऱ्या कित्येक तरुणींचा–घरंदाज स्त्रियांचा सुद्धा साहेबांच्या भोवती वेढा पडू लागला होता. याच वेळेला सुंदर आणि सुशिक्षित उमानं त्यांच्या आयुष्यात प्रवेश केला. एक नवी तारका पडद्यावर आणावयाची या कल्पनेनं त्यांनी उमाकडे जातीनं लक्ष दिलं पण पडद्यावरील उदयोन्मुख तारका म्हणून चमकण्याऐवजी, उमाला त्यांच्या गृहलक्ष्मीची भूमिकाच वठवावी लागली. चित्र सेटवर जाण्यापूर्वीच तिला दिवस गेले होते. पण साहेबही मोठ्या मनानं केल्या कर्माला जागले. तिच्याशी चतुर्भुज झाले. पण ह्या पुढे मात्र साहेबानी काळजी घण्याचं धोरण ठेवलं ! झाली चूक एकदाच निस्तरली जाते !

आणि लग्न झालं तरीही नवे चेहरे शोधण्याचा नाद साहेबाना लागला तो लागलाच ! पण याला त्यांचा तरी काय इलाज होता ? प्रेक्षकांच्या समाधानासाठी नवे चेहरे पडद्यावर दाखविणं त्यांना भागच होतं. या नियमाचंच पालन ते करीत होते. आता या नादापायी काही वेळा साहेबांच्या हातून नको तेही घडलं. . . सुरवातीला त्याना ही अपराधीपणाची जाणीव बोचत असे. पण मग त्यानीही स्वतःला समजावलं ! व्यवहारात अशी देवाण-घेवाण करावी लागतेच ! आणि प्रसिद्धीची हाव असलेल्या बाईला असा थोडासा त्याग करावाच लागतो ! या क्षेत्रात नुसत्या अभिनय-कलेवर कुठं काय जमतं ? इतरही कला अंगी असाव्या लागतात. आणि त्या असल्याशिवाय बाईचा अभिनयगुण नजरेतच भरत नाही ! हे एक कटु सत्य होतं. साहेबांच्याही हे पूर्ण अंगवळणी पडलं होतं. आणि हेच त्याना उदयोन्मुख तारकेला नाईलाजानं पटविणं भाग पडे. त्याशिवाय प्रगतीचा पुढील टप्पा गाठणं कठीण होई ! त्यांच्या आयुष्यात अनेक प्रकारच्या स्त्रिया येत राहिल्या. काही विश्वासानं तर काही फाजील आत्मविश्वासानं आल्या. काही सौभाग्यकांक्षिणी होत्या तर काही सौभाग्यवतीही होत्या. मात्र त्यांचं ध्येय एकच होतं. सिनेमा नटी होण्याचं. . . . आणि साहेबांनी सर्वांना सारखाच न्याय दिला. अगदी सावधपणे स्वतः प्रसिद्धीपराङ्मुख राहून !. . . असल्या बाबतीत ते या कानाचं त्या कानाला कळू देत नसत. त्यामुळे बाईच्या अब्रूला कधी तडा गेला नाही की त्यांच्या संसारालाही काडी लागली नाही ! एकूण ते या शास्त्रात पारंगत झाले होते. मात्र संसाराच्या आणि धंद्याच्या आड त्यानी हे केव्हाच येऊ दिलं नाही. साहेब कुठेही गुंतून पडले नाहीत. त्यांचे हात नव्या कथा लिहिण्यासाठी आणि नव्या चेहेऱ्याचं स्वागत करण्यासाठी सदैव मोकळे असत !

नाव झालं, प्रसिद्धि मिळाली की प्रतिष्ठा येतेच ! या ना त्या



## विश्वदर्शन

जीवनसिंधुमधला हातीं बिंदु लागला हाताला
मोतीबिंब नेत्रांत सांठले, शीण जाहला नयनाला !
गात्रें गळलीं, प्रज्ञा फुलली, फुलली चिंता चितेची
मस्तक झुकलें, प्रज्ञा फांके ! ज्वाला उसळे प्रतिभेची !
सरले बाह्याचे दिन सारे, देवाची किमया न्यारी
रमणीसंगे रजनी रिचल्या, महामंत्र प्यारी ! प्यारी !
चाळिशींत कळशी, आळसाची, गडगडली ह्या संसारीं
छिद्रान्वेषी होउनि सारें, तापविलें मस्तक भारी !
उपवर कन्या झाली म्हणुनि वरखालीं झाला जीव
पुत्र एकहि शिकला नाहीं, करिती सारे मम कींव !
बत्तीस किल्ले ढळों लागले देहाशीं करुनी बंड
मधु बोलुनियां, मधुमेहानीं, हल्ला केला बेबंद !
गुढघ्यामध्यें पाचर मारी, कुणी अनामिक "रोगश्री !"
दृष्टि बदले, चष्मा बदले, काजळली मम भाग्यश्री !
विकलांग जरी, चमत्कार हा, धरतीशीं माझें नातें
अतुर राही, वाढत जाई, जगण्याची इच्छा माते !
आतां कोठें कळों लागला थोडासा जीवन-अर्थ
हपापलेला यमराजपरी करण्या उत्सुक, अनर्थ !
विश्वसुंदरी खरी तूं सुभगा ! अनंत–रूपें भिरभिरसी
रविवर्म्याचे डोळे मजला, असूनीं कां गे चिरचिरसी ?
सूर्यचंद्र, तारांगण, पक्षी, सागर पर्वत उत्तुंग
फुलेंफळें उत्तरें नि रत्नें, काशीचेंहि शिवलिंग !
मेघगर्जना सौदामिनी अन् सुसाट वारा शोषाया
श्वास माझिया जपूनि राखिता, सौख्याचे क्षण वेंचाया !
वर्षांच्या घागरी सांडल्या, महिसन गेले महिने फार
खिजगणति बुडत्या दिवसांची केली नाहीं अपरंपार !
क्षणाक्षणाला वेंचित बसतो कृपणाच्या त्या लोभानें
पळापळाचें सार्थक करतो, थरथरत्या ह्या देहानें
हुरहूर हृदयीं, गिरमीट फिरवी, रुधिरानें दिल होतो लाल,
अवधि थोडा, सोंगें कोटि, धर्मानें डबडबलें भाल !
पुसलें नाहीं कधीं स्वतःला कशास आलों या जगति ?
कोठुनि आलों, कुठें चाललों ? सारी सारी, ही भ्रान्ति !
पुसट कधीं तें झालें दर्शन आभासासम एक दिनीं
यशोदेपरी स्तिमित झालों ! लक्ष दीप लागले मनीं !
सौंदर्याची जननी वसुधे, लावण्याची तूं खाणी
बोलायचें बहुत होतें, परी आजि गेली वाणी
कुशींत घुसलों ज्ञानेशाच्या, आत्मनिरुपण करण्या आज
अशक्त हातामधुनि पडतो साहित्याचा अमरचि साज !
ओष्ठ कांपति, गोष्ट सांगति, पैलतीर तें आलें, हांस !
अखेरचा तो श्वास निसटतां, दर्शन होतें तुझेंचि खास !

— वसंत देशमुख

निमित्तानं सभा-संमेलनांचं अध्यक्षपद भूषविण्याची जबाबदारी साहेबांच्यावर पडू लागली. वेळात वेळ काढून या गोष्टीही त्याना सांभाळाव्या लागत होत्या. ते मोठे होत होते तसा त्यांचा निरनिराळ्या संस्थांशी संबंधही वाढत होता. बरं हे टाळूनही चालत नव्हतं. अनेक संस्था त्यांच्यावर प्रेमानं हक्क सांगत होत्या. साहेबांना तो चालवून घेण्याखेरीज गत्यंतर नव्हतं.

असंच एकदा त्यांच्या मुलीच्या–कल्पनाच्या शाळेचं अध्यक्षपद त्यांच्या गळचात पडलं. प्रिन्सिपॉलनी कल्पनालाच मध्यस्थीला घालून साहेबांचा होकार मिळविला. आणि साहेब वेळात वेळ काढून गॅदरिंगला अध्यक्ष म्हणून गेले. त्या 'कान्व्हेंट'च्या छोटचा-मोठचा विद्यार्थ्यांत मिसळले. त्यांच्या विद्यार्थीदशेत एवढचा मोठचा प्रमाणावर फक्त कॉलेजमध्येच गॅदरिंग होत असत. आता शाळानीही कॉलेजचं अनुकरण केलं होतं. त्यांचं त्यानाच नवल वाटत होतं ! या कार्यक्रमात एका मराठी नाटिकेचा अत्यंत सफाईदार प्रयोग झाला आणि त्यातील एका आठ-नऊ वर्षाच्या मुलाच्या कामावर तर ते बेहद्द खूष झाले होते. त्याची स्पष्ट उच्चारातील शब्दांची फेक आणि अभिनयातील सहजता पाहून आपलं स्वतःचं असं एक बक्षीस त्याचं मनसोक्त कौतुक करून साहेबानी त्याला दिलं आणि ते मोठ्या उत्साहानं घरी परतले.

कार्यक्रमाचा त्याना विसर पडला पण त्या मुलाची–राजूची त्यांना सारखी आठवण येत राहिली. त्याचा सहजसुंदर अभिनय आणि कामाची इतकी समज पाहून ते खरोखरच चकीत झाले होते. त्यांच्या मनात सारखा एकच विचार चालला होता. या मुलालाच घेऊन म्हणजे याच्या भूमिकेलाच प्राधान्य देऊन चित्रपट काढला तर ? याचा जिवंत अभिनय जर एखाद्या चांगल्या कथेला लाभला तर कथानकाचं, आपल्या दिग्दर्शनाचं आणि त्याच्या त्या भूमिकेचं तो सोनं करील. ही कल्पना त्यांना एकदम पटली आणि त्या दिशेनं त्यानी विचारही पक्का केला.

पुढील काही दिवसात साहेबांच्या मनात कथानकाची रूपरेषा साकारली. अल्पावधीतच त्यानी ती शब्दांकित केली. कथा पूर्ण होईपर्यंत साहेब अगदी अस्वस्थ होते. त्यांना दुसरं काहीही सुचत नव्हतं. नेहमीप्रमाणेच ती त्यांनी एकदा, दोनदा, तीनदा स्वतःशीच वाचून काढली आणि ते स्वतःवरच कल्पनेबाहेर खूष झाले. आजपर्यंतच्या सर्व कथात ही कथा त्यांच्या मते सरस उतरली होती. नेहमीच्या रिवाजाप्रमाणे त्यानी ती उमाला वाचून दाखविली. कथा ऐकत असताना तिचे क्षणाक्षणाला पाणावणारे डोळे आणि चेहेऱ्यावर फुलणारं हसू पाहून आपल्या कथेचं सामर्थ्य तिला न विचारताही साहेबाना समजलं. त्यांचा आत्मविश्वास अधिकच वाढला. उमा म्हणजे त्यांचं मोजमाप होतं. तिच्यावरून त्यानी प्रेक्षकांबद्दलचे बांधलेले अंदाज कधीही चुकले नव्हते.

तिनं फक्त एकच प्रश्न केला होता – या कथेत वर्णन केलेल्या तोलामोलाचा चुणचुणीत मुलगा कुठे मिळणार होता ? याचं उत्तर साहेबांनी कल्पनेला बोलावूनच दिलं. राजूच्या आई-वडिलांना भेटण्याची आपली इच्छा व्यक्त केली आणि याची जबाबदारी उमानं उचलली.

एकदोन दिवसातच राजूचा पत्ता काढून ती कल्पनेबरोबर राजूच्या घरी गेली. आणि तिथे सविताला पाहून आश्चर्यचकित झाली. शाळेतल्या मैत्रिणी कितीतरी वर्षांनी अकस्मात् भेटत होत्या. काम बाजूलाच राहिलं आणि अनेक वर्षांच्या गोष्टींचा काथ्याकूट झाला. गप्पा रंगल्या. पण सविताच्या संसाराबद्दल उमानं चौकशी करताच तिच्या डोळचात टचकन पाणी आलं. राजूचे वडील त्याच्या पाचव्या वर्षीच गेले होते हे ऐकून तिचं मन सुन्न झालं.... सविता एकीकडे नोकरी करून राजूचं शिक्षण करीत होती. उमा कसलाही विषय न काढता परतली. पण येताना सविताला आवर्जून बोलावण्यास ती विसरली नाही.

दोन तीन दिवसानी सविता आली आणि उमानं तिची साहेबांशी ओळख करून दिली. प्रथमदर्शनीच तिनं साहेबांवर विलक्षण छाप टाकली. रेखीव बांधा, सावळासाच वर्ण आणि तेजस्वी व टपोरे डोळे पाहून साहेब मंत्रमुग्ध झाल्यासारखे उभे राहिले. आपली अनुभवी नजर त्यांनी तिच्या अंगागावरून क्षणार्धात फिरविली आणि अत्यंत नम्रतेनं–आपुलकीनं तिला नमस्कार केला. चेहेऱ्यावर सौम्य आणि सोज्वळ हास्य प्रकट केलं. स्वतःच्या खऱ्या भावना लपविण्याचं वरदान त्यांना फार चांगलं लाभलं होतं. मोठ्या संयमशील आणि घरगुती आवाजात साहेब बोलू लागले. त्याच बैठकीत आपल्या कथाकथनाचं कौशल्य पणाला लावून कथेबद्दलची झालेली Re-action ते सविताच्या चेहेऱ्यावरून तपासू लागले. सविता संपूर्ण भारावून गेली होती. उमासारखीच भावनावश झाली होती. एकूण बाईचा स्वभाव सारखाच ! साहेब स्वतःशीच हसून म्हणाले. आता परवानगीचा प्रश्नच नव्हता. ती त्यानी न मागताच मिळाली होती. साहेबांच्या मनावरील मोठंच ओझं उतरलं होतं. . .

पटकथा आणि संवाद झपाट्यानं पुरे झाले आणि उत्तम मुहूर्तावर चित्रिकरण सुरू झालं. नेहमीच्याच तडफेनं साहेब चित्रिकरण उरकीत होते. शिवाय राजूची मे महिन्याची सुटी संपण्यापूर्वीच चित्रिकरण संपविणं आवश्यक होतं. सविताची तेवढीच एक अट होती. साहेबानी राजूचं काम चांगलं करून

घेण्यासाठी खूप मेहनत घेतली. हळूहळू फूल उमलावं तशी त्याच्या अभिनयाची पाकळी न् पाकळी ते फुलवीत गेले. त्याची अभिनयातील सहजता त्यानी मोठ्या कुशलतेनं सांभाळली. आणि त्याच्याकडून दृष्ट लागण्यासारखं सफाईदार काम करून घेतलं.

या काळात सविता त्यांच्या कुटुंबातीलच एक व्यक्ती होऊन बसली. कल्पनेला तर तिचा उमापेक्षाही अधिक लळा लागला. सविताच्या प्रेमाचे धागे त्यांच्या कुटुंबांत अनपेक्षितपणे गुंफले गेले होते. साहेबांशी तिचं वागणं अधिक मोकळेपणाचं—आपुलकीचं बनत होतं. हे कौटुंबिक नातं निर्माण झाल्यावरही कधी कधी त्यांच्या मनात तिच्याबद्दल ओढ निर्माण होई. तिच्या बांधेसूद शरीराची आणि गोड चेहेऱ्याची अभिलाषा उफाळून वर येई. आणि साहेब अस्वस्थ होत. . . . पण ते तेवढ्याचपुरते—एकटे असले तरच. त्यांच्या सहवासात येऊन त्यांची शिकार न झालेली अशी कदाचित ती एकटीच स्त्री असावी हे शल्य त्यानाही मधून मधून टोचत राही. पण साहेब विचारी होते. व्यवहारी होते. हा असला बेचैनी वाढविणारा विषय ते क्षणात झटकून टाकीत. . . मनाचा समतोलपणा राखत.

चित्रिकरण पुरं होऊन साहेबानी प्रिंट्स पाहिल्या आणि कधी नव्हे इतके ते आनंदीत झाले. त्यांचा आत्मविश्वास वाढला. आणि त्यांचा हा विश्वास अनाठायी नव्हता याचं प्रत्यंतर त्यांना चित्रपट प्रदर्शित झाल्यावर आलंच. वृत्तपत्रानी त्यांची पाठ थोपटली आणि साहेबानी अर्धा फड जिंकला. राजूनं तर प्रेक्षकांना विशेषत: स्त्रियांना वेडच लावलं होतं. आणि बायकानी एकदा चित्रपट उचलला की किमान रौप्यमहोत्सव कुठेच गेला नाही असा साहेबांचा अनुभव होता. ह्या चित्रपटानं तर साहेबांना कुठल्या कुठे नेऊन बसविलं. एक थोर दिग्दर्शक म्हणून साहेबांचं नाव गाजू लागलं. या चित्रानं गेल्या कैक वर्षांचे रेकॉर्ड मोडले होते. साहेबाना प्रसिद्धी आणि पैसा खोऱ्यानं मिळवून दिला. होता. राजूचंही सर्वत्र कौतुक होत होतं. सविताला तर साहेब देवाप्रमाणं भासत होते. त्यांच्यामुळेच आज तिच्या राजूला नांव मिळालं होतं. ठिकठिकाणी सत्कार समारंभ झाले, चर्चाही घडविण्यात आल्या. आणि या सर्व समारंभाना जनतेनं उत्स्फूर्त दाद दिली

आज याच चित्रपटाला राष्ट्रपतिपदक देऊन जनतेबरोबरच शासनानंही त्यांचा गौरव केला होता. साहेब आज केवळ महाराष्ट्राचेच नव्हेत तर भारताचे महान दिग्दर्शक म्हणून यशाच्या शिखरावर उभे होते. साहेबांचा आणि राजूचा हा मानसन्मान सवितानं डोळे भरून पाहिला. मुंबईला गेल्यावर हे सर्व ती उमाला कौतुकानं सांगणार होती. राजू तिच्या नातेवाईकांकडे दिल्ली पाहाण्यासाठी राहिला होता. आणि ती जास्त रजा न मिळाल्याकारणानं साहेबांच्या बरोबर परत निघाली होती.

हे मानाचं पदक स्वीकारून साहेब आज परतत होते. कृतकृत्य झाल्यासारखे ! आता त्यानी आयुष्यात सर्व काही मिळविलं होतं.... अगदी सर्व काही मिळविलं होतं. मोठ्या संतोषानं साहेबांनी जडावलेले डोळे उघडले. आणि घड्याळाकडे पाहिलं. अकरा वाजून गेल्याचं त्यांना कसंबसं जाणवलं. डब्याबाहेर मिट्ट काळोख होता. त्यानी समोर पाहिलं. सविता अजूनही काहीतरी वाचीत बसली होती. ते तसेच तिच्याकडे पाहात राहिले. अतृप्तीनं, वखवखलेल्या नजरेनं. नजर स्थिर राहात नव्हती. तरीही ते त्या जडावलेल्या नजरेनं शक्य तेवढी तिला साठवू पाहात होते. पुन्हा पुन्हा तिच्या शरीरावरून नजरेचं पीस फिरवत होते. नशेनं आता चांगलाच अमल चढविला होता. कानशिलं तापली होती. पण आता त्याना ते काहीच जाणवत नव्हतं. डोळ्यासमोर फक्त सवितेची आकृती विसावली होती.

आणि तिच्याकडे पाहातच मनातल्या मनात ते स्वत:शी हसू लागले. स्वत:लाच प्रश्न विचारू लागले, . . . "म्हणे सर्व काही मिळालं . . . सर्व काही मिळविलं . . . अं ? काय मिळवलं ? आणि जर सर्व काही मिळालं असेल, तर त्यात ही कशी नाही मिळाली... कशी नाही मिळाली अजून ? साहेब स्वत:लाच प्रश्न विचारीत तिच्याकडे पाहात राहिले. एखाद्या कसलेल्या शिकाऱ्याने सावजाकडे पाहावं तसं !

साहेबानी एकदा बाटलीकडे पाहिलं आणि उरलीसुरली "व्हॅट" तशीच तोंडाला लावली. आता त्यांना बर्फाची जरूर भासली नाही की सोड्याची आठवण झाली नाही. बाटली खाली ठेवून ते उठले. अजूनही पावलं लटपटत नव्हती ! निदान साहेबाना तरी तसं वाटलं नाही. . . .

सूटकेस उघडून साहेबानी स्वत:च चादर बाहेर काढली आणि ते सवितेजवळ गेले. त्यांची सावली पडताच चमकून तिनं साहेबांकडे पाहिलं. साहेब तिच्या तोंडाजवळ तोंड नेत हसले. . . अगदी आशाळभुतासारखे. . . .

काहीतरी विपरीत घडतं आहे या स्त्रीसुलभ जाणिवेनं ती

**संसार कथा**



**"माझ्या बायकोकडे सर्व रोगांवर एकच 'रामबाण' औषध आहे आणि ते मिळण्याची वेळ हीच आहे. असाच जरा पुढं जा आणि तुझी 'डोकेदुखी' कायमची बरी करून घे."**

झट्दिशी उठून उभी राहिली. पण अगदी सहजतेनं हसत, हसतच साहेबांनी तिच्या खांद्यावर आपल्या हातांचा जोर देऊन तिला परत खाली बसविलं. . . नव्हे, तिला बसणं भागच पडलं. आणि ते अगदी मोकळेपणानं हसतच तिच्याजवळ बसले.

सविताच्या अंगावर सरारून काटा उभा राहिला होता. भावी संकटाची जणू चाहूल आणणारा ! भीतीनं तरीही आश्चर्यानं ती साहेबांच्या या नव्या अवताराकडे पाहू लागली !

"काय झालं एकदम इतकं परक्यासारखं वागायला ?" साहेबानी धीर दिल्यासारखं तिच्या पाठीवर हळू हळू थोपटत विचारलं.

शक्य तितकं अंग चोरून घेत आणि त्यांचा हात झटकून टाकत, लांब सरकण्याचा तिनं अयशस्वी प्रयत्न केला. पण हात झटकताना तिचाच हात त्यांच्या हातात सापडला होता. . . . साहेबांनी क्षणातच पकड घट्ट करून तिला संधी मिळण्यापूर्वीच पुन्हा आपल्याजवळ ओढली. हाताची पकड अधिकच घट्ट केली !

तिनं असाहाय्यपणे साहेबांकडे पाहिलं आणि मानेनंच ती नकार दर्शवू लागली. . . हात सोडविण्याचा प्रयत्न करू लागली.

"साहेब. . . सोडा ना हात. . . साहेब. . . साहेब. . ." आपले हात शक्य तितके मोकळे करण्याचा प्रयत्न करीत सविता कशीबशी उद्‌गारली.

कसंही करून हा प्रसंग टाळणं आवश्यक होतं पण तिला उपाय सूचत नव्हता. . . . ती क्षणाक्षणाला अधिकच हतबल होत होती. . . . हतबुद्ध बनत होती. नुसत्या त्या कल्पनेनंच तिची तिलाच शरम वाटू लागली होती पण साहेबांची अंगलट वाढतच होती.

"साहेब. . . .साहेब काय करताहात हे ? सोडा ना..." ती हाताला झटका देत म्हणाली आणि उरली सुरली शक्ती पणाला लावून तिनं आपले दंड त्यांच्या हातातून सोडवून ती बाजूला झाली. . . .उभी राहाण्याचा प्रयत्न करू लागली. . .

पण साहेबांच्या हातात तिचा पदर आला होता. . .ही असली अवस्था त्याच क्षणाला तिच्या लक्षात आली, आणि घडपडतच चेहेऱ्याबरोबरच उघडं पडलेलं शरीरही झाकून घेण्याचा ती केविलवाणा प्रयत्न करू लागली. . . .

क्षणार्धात जे दिसलं ते साहेबानी आधाश्यासारखं पाहून घेतलं आणि अधिक दिसण्यासाठी ते पदराशी खेचाखेच करीत राहिले... शरमेनं चेहेरा झाकीत सविता ओक्साबोक्शी रडत होती. . .पदर अंगाकडे खेचण्याचा प्रयत्न करीत होती.

पण एकाच झटक्यासरशी साहेबानी तिला जवळ ओढली आणि धडपडतच ती पुन्हा त्यांच्या बाजूला येऊन कोसळली.

"अशी कां परक्यासारखी वागतेस सविता ? माझा आता एवढा सुद्धा अधिकार नाही ? की मी कुठे बाहेर या गोष्टीची जाहिरात करून तुझ्या अब्रूवर शितोडे उडविणार आहे मागाहून ?" साहेबानी घोगऱ्या आवाजात पण अतिशय समजावणीच्या स्वरात प्रश्न करीत तिची हनुवटी वर उचलण्याचा प्रयत्न केला.

मानेला हिसडा देऊन तिनं आपली हनुवटी चपळाईनं दूर केली आणि त्यांचा कमरेवरचा हात सोडविण्यासाठी ती धडपड करू लागली.

"साहेब. . .खरंच असलं काही मनात आणू नका. . . माझ्या स्वप्नातही कधी तुमच्याबद्दल असला संशय आला नव्हता ! म्हणूनच राजूला तिथं ठेवून तुमच्याबरोबर मी एकटी अगदी विश्वासानं आले. . .दुसरं काहीही सांगा. . . खरंच, तुमच्यासाठी माझं आयुष्य सुद्धा देईन, इतके उपकार आहेत तुमचे आमच्यावर पण हे असलं पाप मनातसुद्धा आणू नका. . .खरंच आणू नका साहेब. . . .साहेब. . . . सोडा ना पदर. . . ." ती हुंदके देत केविलवाणेपणानं सांगू लागली.

"सविता. . . सविता. . . माझ्यावर विश्वास आहे ना तुझा?" साहेब अधिकच जवळ सरकून पुन्हा मुलायम आवाजात बोलू लागले. "ह्या गोष्टीची मी कुठेही वाच्यता करणार नाही. तुझ्याइतकीच तुझ्या अब्रूची मलाही चाड आहे. नाहीतर मग आपलं माणूस ह्या शब्दाला काय अर्थ राहिला ? ही गोष्ट फक्त तुझ्यामाझ्यातच आहे आणि फक्त आपल्या दोघातच राहील. . . अगदी शपथपूर्वक. . ." तिच्या गळ्याला हात लावीत साहेबानी शपथ घेतली.

ही असली नकाराची भाषा साहेबाना अगदीच अपरिचित नव्हती. पण विश्वास निर्माण केला की काम होतं, असा साहेबांचा अनुभव होता आणि म्हणूनच साहेबानी हा पवित्रा टाकला होता.

"ते बघ, इतका हट्ट नाही करायचा. . . निदान माझ्याजवळ तरी. खरंच मी इतका परका राहिलोय का आता ? माझ्या वाढदिवसाला मुद्दामहून गुलाबाचं फूल दिल्यावर. . . नव्हे, अगदी उमासमोर, ते माझ्या कोटाला लावल्यावर ? दुसरा काय अर्थ होता त्यामागे ? मला आवडणारे पदार्थ वारंवार माझ्यासाठी घरून बनवून आणून अगदी प्रेमानं मला आग्रह करकरून खाऊ घातल्यावर ? माझ्या शिंप्याकडे माझ्या आवडत्या रंगाचं कापड देऊन आणि त्याच्याकडे असलेल्या माझ्या मापावरून कोणालाही न कळविता परस्पर माझा सूट बनवून या चित्राच्या रौप्यमहोत्सवाच्या दिवशी हक्कानं पण खरं तर प्रेमानं मला तो सूट घालून जाणं भाग पाडल्यावर ? उमाला सुद्धा तू मागं सारलंस माझ्यावर प्रेम करण्याच्या शर्यतीत ! हे तुझं मन माझ्या लक्षात आलं नाही असं का वाटलं तुला वेडे ? तुझ्यासारखीच माझीही अवस्था झाली होती ! तुला मी प्रथम पाहिली तेव्हापासूनच ! ते व्यक्त करायचीच संधी आज देवानं आपल्याला दिली आहे. . . . खरं ना ? तिला अधिकच जवळ घेण्याचा प्रयत्न करीत साहेब म्हणाले.

'साहेब. . . . . . .साहे ऽ ऽ ब'. . हिसडा देऊन सविता बाजूला होत ओरडली ! "खरोखर अर्थाचा अनर्थ करताय तुम्ही ! माझ्या आपलेपणानं वागण्याचा, तुमच्याबद्दल असणाऱ्या कौतुकाचा उलटा अर्थ लावताहात. . . तुमच्या मनात असलेलं प्रेम

अनुक्रमणिका








मी कधीच केलं नाही, साहेब.....अगदी स्वप्नातसुद्धा! तुमच्या वाढदिवसाला मी गुलाबाचं फूल दिलं– नव्हे ते अगदी उमासमोर तुमच्या कोटाला लावलं, पण तुम्ही तो अंगात घातल्यावर नव्हे! तुमचा कोट हँगरला असताना.... तसला अधिकार फक्त उमाचा! आणि फूल दिलं ते तुमच्याविषयी असलेल्या आदरानं– भक्तीनं.... त्यात तसल्या प्रेमाला स्थान नव्हतं! आणि म्हणूनच उमा स्त्री असूनही तिच्या मनात कसलाच संशय आला नाही....

"तुमच्या आवडीचे पदार्थ मी वारंवार बनवून आणीत होते... तुम्हाला आग्रहानं खाऊ घालीत होते.... खरं आहे ते! पण ज्याला स्त्रीनं चांगल्या भावनेनं आपला म्हणून मानला, त्याच्या आवडीनिवडी कौतुकानं पुरविताना – त्याला आग्रहानं वाढताना स्त्रीला जे काही समाधान लाभतं ते स्त्रीच्या जन्माला आल्याशिवाय कधीही समजणार नाही साहेब तुम्हाला!

"तुम्हाला मी सूट शिवला.....अगदी तुम्हाला न कळविता. त्यात फक्त तुम्हाला चकित करण्याचाच हेतू नव्हता.... या चित्रपटाच्या रौप्यमहोत्सवानिमित्त–राजूसाठी तुम्ही घेतलेल्या कष्टानिमित्त – तुमच्या बद्दल वाटणारी कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी, आणि सख्या बहिणीपेक्षाही तुमच्यावर केलेल्या मायेचं–प्रेमाचं, ती भेट म्हणजे प्रतीक होतं. तुम्हाला नसली तरी उमाला मी सर्व काही कल्पना दिली होती! त्या प्रेमाचा... मानलेल्या नात्याचा तुम्ही...."

"सविता, मी फक्त रक्ताची नाती मानतो! कल्पनेतली किंवा मानलेली नव्हेत....." तिचं वाक्य मध्येच तोडीत साहेब आवाज चढवून म्हणाले. बहिणीचं नातं जोडण्याच्या तिच्या या युक्तीनं ते एकदम रागावले होते.

"सुदैवानं किंवा दुर्दैवानं मला सख्खी बहीण नाही! आणि तुला बहीण म्हणून मानण्याचं माझ्या स्वप्नात सुद्धा शक्य होणार नाही मला....! लोकांसमोर हे नातं ठीक आहे... तशी तुझी इच्छा असली तर लोकासमोर हे मानायला माझीही हरकत नाही!" साहेब मिस्किलपणानं हसत म्हणाले. "पण आपल्या दोघात?..." तिच्या बांधेसूद शरीरावरून आपली नजर मोठ्या चवीनं फिरवीत साहेब पुन्हा शांत स्वरात म्हणाले... तिला अधिकच जवळ ओढून कुरवाळू लागले – तिची परत परत समजूत घालीत, एकीकडे त्यांना "हव्या" असलेल्या जागी सराईतपणे हात फिरवीत राहिले... .छद्मीपणानं हंसत–अधिकच धुंद होऊन....

"साहेऽऽब..." किंचाळत उसळी मारून सविता उठून उभी राहिल. त्यांच्यापासून लांब जाण्याचा प्रयत्न करू लागली.

साहेबही आता इरेला पेटले होते... तिच्या या असल्या वागण्यानं मनोमनी चिडले होते, डिवचलेही होते. त्याच झटक्यात ते तिच्याजवळ जाण्यासाठी उठले तो सविताच अचानक बदल झाल्यासारखी रडत, रडत मागे वळली आणि सरळ त्यांच्या समोर येऊन उभी राहिली! डोळे विस्फारून त्यांच्या नजरेला नजर भिडवीत पदराचीही शुद्ध नसल्यासारखी!

तिच्या या अवतारानं साहेबही क्षणभर चकीत झाले!

"या.... घ्या साहेब... घेऊन टाका, घ्या... घेऊन टाका एकदा... सगळं तुमचंच आहे... तुमच्याच रक्ताचं! मानलेलं नव्हे साहेब अगदी खऱ्याखुऱ्या तुमच्याच रक्ताचं! घ्या ना! ती त्यांच्याकडे पाहात अलिप्तपणानं बोलू लागली.

"सविता" साहेब एकदम बेभान होऊन ओरडले.

"ओरडू नका साहेब." सविता त्याच स्वरात म्हणाली. "खरं तेच सांगतेय! जे आयुष्यात कधीच सांगणं जमलं नसतं ते अगदी अनिच्छेनं— नाईलाजानं सांगण भाग पाडलंत आज... तुमच्यावर सख्या बहिणीसारखी माया केली, प्रेम केलं असं म्हटलं मी.... पण ते मानलेल्या नव्हे – खऱ्याखुऱ्या रक्ताच्या!"

ती हुंदके देत सांगू लागली.

"तुम्हाला काहीच कल्पना नाही पण तुमच्याबद्दल मला सर्व ठाऊक होतं! अगदी अखेरच्या क्षणी आईनं कल्पना दिली मला त्याची! इनामदार तुमचे वडील. साताऱ्याला तुमचं घर होतं आणि कऱ्हाडला तुमच्याच वडिलांचं दुसरं एक घर होतं ते माझ्याच आईचं! मी तुमच्याच वडिलांची मुलगी!... ही गोष्ट आईनं शेवटपर्यंत गुप्त ठेवली होती. इनामदार हाय खाऊन गेल्यावरही तिनं त्यांची अब्रू सांभाळली. पुढं तिनंच एकटीनं माझं सर्व काही केलं. तुमची 'उमा' कऱ्हाडचीच. आम्ही एकाच वर्गात होतो. इतक्या वर्षानी तिची भेट होईपर्यंत ते तुम्हीच आहात याची मला तिळमात्रही कल्पना नव्हती...आणि मग तुम्ही 'तेच' आहात अशी खात्री पटली तरीही तुमच्या आणि पर्यायानं माझ्याही वडिलांची बेअब्रू करणं आणि वडिलांच्या बाहेरख्यालीपणाची नसलेली जाणीव तुम्हाला मुद्दामहून करून देण्याचं धैर्य मलाही झालं नाही." ती रडत म्हणाली..."मात्र सख्या नाही तरी रक्ताचा भाऊ नशीबानं मिळाला म्हणून मी खुषीत होते. ह्या वर्षीची खरी भाऊबीज मानलेल्या भावाच्या नात्यानं पण खऱ्याखुऱ्या भावाकडून हक्कानं वसूल करण्याची मी स्वप्नं पाहात होते. ती ओवाळणी आज अशा स्वरुपात मिळते आहे!... यालाही नशीब लागतं.... यालाही नशीबच लागतं..." घसरलेल्या पदराचा बोळा तोंडात कोंबून हुंदका देत सविता रडत म्हणाली.... आणि साहेब उभ्याउभ्याच खाली कोसळले....

• • •

## प्रक्षोभक विचारकथा







**दाताने** ऊस आणि रस्त्याकडे पहात डोळे मोडत दारातल्या खुर्चीत जन्नत बसली होती. येस्वदा–गुलबी आसपास वावरत होत्या. म्हातारी घरवाली कोपऱ्यात पत्त्याचा डाव मांडून होती.

येस्वदा–गुलबीशी फिदी फिदी हसता बोलताना ऊस चावायला मोठी मजा वाटत होती. एक पाय वर घेऊन खुर्चीतली बैठकही तिने नीट जमवली होती. खाली सोडलेल्या दुसऱ्या पायाला ती खुषीने झोके देत होती. खुर्चीतून न उठताच दारातल्या पायरीशेजारी उसाचा चोथा थुंकत होती.

दारासमोरच्या रस्त्यावर एक भैय्या रेंगाळत होता. उकाडा होतच होता. वारा घेण्याचा बहाणा करून छातीवरचा पदर तिने साफ काढला. हात मानेच्या मागे नेऊन अंग ताणून आळस दिला. भैय्याला तिच्या भरगच्च्य छातीचं दर्शन झालं तसा पुढे सरकायचा विचार सोडून तो तिथेच अडला. इथं शिरावं की नाही...? त्याचा विचार अजून पक्का व्हायचा होता. पण आता जन्नतने त्याच्याकडे पाहून असा काही डोळा मोडला की जुत्याचे नाल वाजवत भैय्या मुकाट पायरी चढून वर आला.

पुढचा सगळा नखरा मग येस्वदेने केला. गिऱ्हाईक पटवलंन. जुते वाजवत भैय्या तिच्या मागोमाग आत गेला.

पण आत जाऊन बराच वेळ झाला तरी आतून अजून जुत्याचाच आवाज येत होता. म्हातारी अस्वस्थ झाली. ओरडून म्हणाली–

"अग येऽऽयेस्वदे . . . . अभितक जूताभी नही निकाला फलनवाने. चल आटप लवकर. येल लावू नगं उगीच."

**त्या कळीसरशी पोराला जवळ ओढून त्याच्या चेहेऱ्याचे ती मटामट मुके घेत सुटली. या तिच्या भडीमाराने तो विलक्षण गांगरला. हैराण झाला. पण त्याच्या कुठल्याच अवस्थेकडे पहायला तिला आता सवड नव्हती....**

---

म्हातारी अशीच आहे. कुरबुरी. अजून एक खोली खाली होती. भैय्याशिवाय दुसरं आणि कुणी गिऱ्हाईक नव्हतं. पण म्हातारीला ही सवयच होती. गिऱ्हाईक आत शिरून दार लागले नाही तर हिचा 'आटप लवकर'चा लकडा सुरू व्हायचा.

गुलबीला घेऊन बसवण्णा असाच एकदा आत गेला होता. मागोमाग सवयीनुसार म्हातारी ओरडली होती—

"गुलब्ये ऽ ऽ खाली फोकट टेम मत लगाव."

काढलेलं खमीस पुनः अंगात चढवीत घडाडकन् दार उघडून बसवण्णा बाहेर आला होता. बरोबर आणलेल्या दोस्तालाही बाहेर काढून या घराला शिव्या घालत तरातरा निघून गेला होता. आणखी कुणी गिऱ्हाईक त्या दिवशी त्या घराची पायरी चढलं नव्हतं.

तेव्हापासून म्हातारीनं बसवण्णाच्या बाबतीत तेवढी आपल्या या सवयीला मुरड घातली होती. बाकी गुलबीनं बसवण्णाला पुरं नादावलं होतं. म्हणूनच केवळ आठ दिवसात बसवण्णा पुनः या घराची पायरी चढला होता. म्हातारीलाही बसवण्णाची कदर न करून भागण्यासारखं नव्हतं. या घराच्या कमाईतला बराच मोठा भाग बसवण्णाचा हात धरून या घरात येत होता.

बसवण्णा मोठा वल्ली होता. ट्रक नाहीतर प्रायव्हेट कार हाकायचा. बरी कमाई करायचा. मात्र त्याच्या या कमाईचा या घराशी काही संबंध नव्हता. हीच तर गंमत होती. बाईचा हा षौक बसवण्णा आपल्या दिडकीने करीत नसे. कुठून कुठून गब्बर माणसे हुडकून काढायचा. त्याना या घराची दीक्षा द्यायचा. मोठ्या दिलदारपणे त्यांचे खिसे आपल्या हातानी इथे रीते करायचा.

बसवण्णा आला की गुलबी मोठ्या खुषीत असायची. नवीन सिनेमा आला म्हणजे तर तिला बसवण्णाची खूप याद यायची. सिनेमासाठी बसवण्णा तिला खुषीने निराळे पैसे देऊन जायचा. एकदाच काय तो तिला असे पैसे देताना कुरबुरला होता. त्या दिवशी त्याने आणलेला दोस्त त्याच्या अपेक्षेपेक्षा थोडा कमी निघाला होता. गुलबीला सिनेमाचे पैसे दिल्यानंतर परत जाताना व्हिक्टोरीयाचं भाडं बसवण्णाला द्यावं लागलं होतं.

आणखी एक गंमत होती. दोस्त घेऊन बसवण्णा यायचा तेव्हा गुलबी खुषीत असली तरी तशी दिसायची मात्र नाही. उलट ती जास्तीत जास्त पाठ बाहेर काढून आणि छाती आत ओढून बसायची. बसवण्णाची आणि तिची ती खुबीच होती. हेतु हा की त्याच्या दोस्तांच्या मनात ती भरू नये.

या वेळी जन्नत पुढे होई. लगबग करून बसवण्णाच्या भल्या दोस्ताला भुलावण

सुरेश वेंगुर्लेकर

घालून आपल्या मागून नेई. नेहमीसाठी हे ठरून गेलेलं होतं. बसवण्णाच्या येण्याकडे गुलबी डोळे लावून असे तशीच जन्नतही. मात्र गुलबी बसवण्णाचीच वाट पहात असे. आणि जन्नत बसवण्णाच्या दोस्ताची.

या बसवण्णाला काय खुबी सावली होती ठाऊक नाही. इथं यायला जुना दोस्त त्याला फार दिवस पुरत नसे. पण कुठून ना कुठून नवा दोस्त पैदा केल्याविना तो रहात नसे. त्याच्या अशा या नव्या दोस्ताला इथला पहिला वहिला धडा द्यायचं काम ठरल्यानुसार जन्नतकडे येई. जन्नतलाही ते मनापासून आवडे.

बसवण्णाबरोबरच्या या नवागतात कधी मधी एखादा बुढ्ढाही उपटत असे. पण तो कधीमधी. बाकी बहुधा सगळे तरणे तगडे गडीच असायचे. जन्नतची मग चंगळ व्हायची. या नवागतांसमवेत स्वतःचीही ती दिल् चाहेल तेवढी करमणूक करून घ्यायची.

आणि मग बसवण्णाचा नवा दोस्त एके दिवशी बसवण्णाशिवायच येई आणि त्याचा नवेपणा संपून जाई. बसवण्णाला मग आणखी कुणी नवा दोस्त शोधण्याची आवश्यकता निर्माण होई. जन्नत मग पुनः एका अनोळखी चेहेऱ्याची वाट पाहू लागे.

कधी कधी हे नुसतं वाट पहाणंही जन्नतला खूप आवडत असे. काळजाला कसली तरी ओढ लागल्यासारखं होत असे.

आतासुद्धा जन्नतच्या मनाची तशीच अवस्था झाली होती. दाताने ती जो ऊस चावत बसली होती—तो भल्या सकाळी बसवण्णानेच आणून दिला होता. नवी कोरी फिआट गाडी गच्चकन् दारात उभी करून गाडीतून तो पुकारत राहीला होता—

"अबे वो गुलबकावली ऽ ऽ. . . "

गुलबीला तो गुलबकावली म्हणे. ही त्याची गुलबकावली अजून अंथरूणातच लोळत पडली होती. जन्नत नुक्तीच उठली होती— ती दारात आली.

"हाय अल्ला. इतक्या सकाळीच कुठनं आला तू बसवण्णा ? बिछाने मे मर पडी है तुम्हारी गुलबकावली. जगावू क्या ?"

"अरे न्हावून दे. रात्रीला येल म्हणून सांग.....आणि हे ऊस खाऊन जावा. रात मोठी मिठी बनायला पायजे."

तो मोठ्याने हसला. त्याचं हे बोलणं जन्नतच्या लक्षात आलं नाही. तिचं लक्ष त्याच्या नव्या कोऱ्या गाडीवर खिळून होतं.

"काय बगत ऱ्हायली तू जन्नत ?"

"गाडी तुजी."

"फाकडू हाय का नाई ?"

मग जन्नतला डोळा घालून तो पुनः म्हणाला—"खूष ऱ्हा तू जन्नत. 'कार'का मालिककोच लेके आयगा रातको."

मग पुनः एकदा मोठ्यांदा हासून फार्रर्‌कन् गाडी काढून तो निघन गेला होता.

दाताने ऊस चावता चावता आणि रस्त्याकडे पहात डोळे मोडता मोडता खरं म्हणजे जन्नत त्या 'कार'का मालीकची वाट पहात होती. पण फलनवा जुते वाजवत परत बाहेर आला. तरी अजून कुठे त्याचा पत्ता नव्हता.

ताड ताड थेंब आपटत पावसाची एक मोठी सर आली. रस्त्यावरच्या गर्दीची तारांबळ उडाली. उगाचच दार हुंगत रेंगाळणारे कोपऱ्यावरच्या बारवाल्याच्या आश्रयाला धावले. काही पानाच्या ठेल्यापुढल्या अपुऱ्या छपराखाली घुसले. या गर्दीत खरंच गिऱ्हाईकं होती त्यातल्या पुष्कळानी अधिक चोखंदळपणा न करता जवळच्या घराचा आश्रय घेतला. या घराला मात्र या धावपळीपासून काही लाभ झाला नाही. पावसाच्या सरीने अडवलेला फलनवा तेवढा अजूनही दारातल्या पायरीवर खोळंबून उभा होता.

तेवढ्यात एक व्हिक्टोरीया दारासमोर येऊन थांबली. आतून बसवण्णा उतरला. चिचोळ्या पायरीवरून भय्याच्या बाजूने वाट काढीत वर आला.

एकट्या बसवण्णाला पाहून जन्नत अस्वस्थ झाली. घाईने म्हणाली—

"हाय राम, तेरे कारका मालिकका टायर पंक्चर हुआ क्या रे ?"

"हां हां सिर्फ टायर पंक्चर हुआ. मालिक नहीं."

मग दाराकडे पाहून बसवण्णा म्हणाला—

"अबे तू वहाँही खडा रहा ? वो फलनवा उसको उप्पर आनेको रास्ता तो छोडो."

फलनवा बाजूला झाला. आणि इतका वेळ त्याच्या देहाआड असल्यामुळे न दिसलेला कारका मालिक बुजत बुजत पायरी चढून वर आला. जन्नत त्याच्याकडे पहातच राहिली.

अवघं सोळासतरा वर्षांचं ते पोरगं होतं. बुजऱ्या नजरेनं इथलं वातावरण न्याहाळत होतं. आरशाच्या कपाटाआडून दोन दिवसांपासून डोकावू लागलेल्या उंदराच्या पिलाची जन्नतला याद आली. तिला मजा वाटली.

फॅशनवाले टोकदार बूट त्याच्या पायात होते. भडक रंगाचे नक्षीदार नायलॉनचे मोजे बुटांवर दिसत होते. तंग तुमान त्याने पेहेनली होती. वर चिटाच्या कापडाचे फिट्ट अंगातले होते.

चेहेरा त्याचा लहानसाच होता. बुंद गोऱ्या वर्णाचा. पोरीसारखी हनुवटी. लाल पातळ ओठ. ओठांवर लव होती पण तिच्या रंगात कुठंच गडदपणा नव्हता. डोळ्यातले भाव भित्रे होते. आणि त्याच्या लहानशा चेहऱ्याच्या मानाने केवढा तरी वाटणारा केसांचा कोंबडा त्याने काढला होता.

जन्नत अजूनही त्याच्याकडे पहात राहीली होती. तेवढ्यात बसवण्णा खाकारला तशी दचकून तिनं त्याच्याकडे पाहीलं. बसवण्णाने तिला डोळा घातला. जन्नत सावध झाली.

पण या सावधपणाचा तिला काही उपयोगच होईना. या पोराला भूलविण्यासाठी नेहमीचे अंगविक्षेप करण्याची इच्छा तिला आज होईना. त्या अंगविक्षेपासाठी अवयवांवर आपली नेहेमीची सत्ता चालत नसल्याचा चमत्कारिक अनुभव ती आज घेत होती. आपल्याला हे असं काय होतंय तिला कळेना.

पुनः एकदा बसवण्णा खाकारला. या वेळी तिने त्याच्याकडे पाहीलं नाही. पोराकडे पाहून मात्र ती प्रसन्नपणे हंसली. आवर्जून त्याला म्हणाली— "आ वो नाऽऽ.."

तिच्या स्वराने तिची तीच आश्चर्यात पडली. आपल्या शब्दात इतकी अशी माया कुठून दाटून आली ?...ती विचारात पडली.

जादू घातल्यासारखा पोरगा तिच्या मागोमाग गेला. तो आत आला तसं जन्नतने खोलीचं दार लोटून घेतलं.

खोलीत एका भिंतीला पलंग होता. पलंगाच्या समोरच्या कोपऱ्यात मोरी होती. एक विटका जुना पडदा आपल्या कुवतीप्रमाणे मोरीला आडोसा करून होता. मोरीच्या कट्ट्यावर पाण्याचं पिंप होतं. पाणी घ्यायला ॲलिम्युनियमचं भांडं होतं. दारालगतच्या भिंतीशी एक हडपा होता. हडप्याच्याच वर फ्रेममध्ये यल्लमाचं चित्र वस्ती करून होतं.

समोरच्या भिंतीवर एक कॅलेंडर होतं. कॅलेंडरातल्या चित्रात गुटगुटीत बाळकृष्ण गाईची आचळं चोखत होता.

पोरगा अजून दाराशीच उभा होता. बावरल्या नजरेने खोलीत सगळीकडे पहात होता. त्याच्या हालचाली न्याहाळत हडप्यावर बसलेली जन्नत पुनः त्याला म्हणाली—

"इधर आवो नाऽऽ. . . "

तो थोडासा हालला. पाऊलभर पुढे आला. तेवढ्यात त्याचं लक्ष यल्लमाच्या चित्राकडे गेलं तसा तो पुनः दाराशीच थांबला. पायातले बूटमोजे त्याने दाराशी काढून ठेवले. हे त्याचं वागणं जन्नतला एकदम आवडून गेलं.

भीत भीत तो हडप्यावर तिच्या शेजारी येऊन बसला. पण नजर उचलून अजून तिच्याकडे तो पाहीना. जन्नत त्याला म्हणाली—

"बाबूजी को हम कैसे पुकारना—?"

गोंधळून तो तिच्याकडे पहात राहीला. तशी त्याचे केस विस्कटत ती म्हणाली—

"अरे नाम तो बतावो ना—"

"किसनलाल."

"अय्योऽऽ भगवानका नाम है रे तुमरा."

तो पुनः पंचायतीत पडला. मग त्याची हनुवटी वर उचलून कॅलेंडरातल्या चित्राकडे तिने बोट दाखविले.







त्या चित्राकडेच तो मग पहात राहीला. पांढरीवोप गाय. तिची तट्ट फुगलेली ओटी. आचळाना डसलेला निळा निळा वाळकृष्ण.

"भोत अच्छा है नहीं ?"

तिचा प्रश्न त्याला पटकन् कळल. नाही. तशी ती पुन्हा म्हणाली–

"वो क्यालींडर रे !"

आता मान हालवून त्याने तिच्या म्हणण्याला संमती दर्शविली.

"वसवण्णानेच दिया हमको. ये साला वसवण्णा कहाँ मिला रे तुमको ?"

"वो नया ड्रायव्हर है हमारा."

"हाय अल्ला. तुमारी गाडी क्या फस्कीलास है रे..... बिलकूल मालिक के जैसी."

आणि त्याचं नाक पकडून ते हालवत ती खळाळून हसली.

तिच्या या अनपेक्षित वागण्याने तो गांगरला. म्याला. तिच्या वोटांच्या चिमटीतलं आपलं नाक सोडवून घेण्यासाठी कसेबसे त्याने तिचे हात धरले. नाक मोकळं झालं तशी ते धरलेले हात सोडून देण्याच्या बेतात तो होता––पण आता जन्नतने आपल्या बोटात त्याची बोटं घट्ट गुंफून धरली होती. त्याचे हात हातात घट्ट घट्ट दावून धरून ती त्याच्या नजरेत एकटक पहात राहिली. त्या नजरेने तो बेचैन झाला. भोसकल्यासारखी ती नजर आपल्या शरीरातून घुसत असल्यासारखी त्याला वाटली. शरीरातली ऊब नजरेच्या स्पर्शाने गोठून जाऊ लागली नि आधार पायाखालचा सुटत असल्याचा त्याला भास झाला.

हाताना त्याच्या कंप सुटला तशी ती त्याला म्हणाली–

"क्या हुवा रे तुमको ? हात कितने ठंडे मालूम होते हैं तुमारे ?"

आपल्या दोन्ही हातात त्याच्या हातांचे दोन्ही तळवे घेऊन तिने ते एकमेकांवर जोराने घासले. त्यात कितीशी ऊब आलीय हे पाहाण्यासाठी आपल्या दोन्ही गालांवर दाबून धरले. हात हातावर घासूनही हातात त्याच्या यावी तेवढी ऊब आली नाही. तेव्हा मग तिने त्याला कुशीत ओढून घट्ट घट्ट आवळले.... चांगले गुदमरेपर्यंत आवळले. नि मग सावकाश मिठी सैल करीत ती त्याला म्हणाली–

"किसनबाबू थोडी चाय पी लेना. यूंऽऽ ठंडी भाग जाएगी तेरी. मै अभ्भी मंगाती हूं."

तिच्या मिठीने अवघडलेली मान एकदम जोराने हालवीत तो म्हणाला–

"नही चाय नही होना."

"तो काफी पिओगे क्या ? अरे काफीकी भी ऐसीकी तैसी. वस मै दूधही लाती हूं."

वारवाल्याच्या पोराला हाक द्यायच्या घाईत दारातल्या पायरीवर पाय तिचा घसरलाच.

"अजी मर गई. . . ओ ऽऽ"

पोर वारवाल्याचा तिथंच जवळ निघाला.

"अरे किसपर मर रही तू जन्नत ?"

"साले तुमपरही. जा दूध ले आना एक गिलास. अच्छा गर्रर्रम होना फसकीलास."

पोराने आणून दिलेले दूध चांगलेच गरम होते. तळहातावर पदराच्या घड्या घालून त्यावर ग्लास तिने अलगद धरला. तो डुचमळणार नाही अशी पावलं टाकत ती खोलीत परतली. हडप्यावर बसल्या बसल्या पोर अजूनही भिंतीवरल्या क्यॅलेंडराकडेच पहात होता. ग्लास त्याच्या समोर भरत ती म्हणाली—

"ले – लेना."

यावर तो नुसताच तिच्याकडे पहात राहिला.... तशी ती पुनः म्हणाली—

"अजी लेवोना...नहीं तो खडी खडीही मैं बन जाअेंगी बुढी."

तिच्या हातून दुधाचा ग्लास घेण्यासाठी त्याने हात पुढे केला पण तापलेल्या ग्लासाचा चटका बसला. तसा लगेच पुनः तो मागे ओढला.

"अयय्योऽऽ भोत गर्रर्रम है क्या रे..."

फुंकर घालत घालत दूध तिने थोडे निवू दिले. मग ग्लास त्याच्या समोर धरून ती म्हणाली—

"बस, अभी इतना गरम पी लेना. ठंडीको भगाना है ना ?"

खिशातून रूमाल काढून त्याच्या साहाय्याने मोठ्या काळजीपूर्वक त्याने तिच्या हातून ग्लास घेतला. सावकाश फुंकून फुंकून भीत भीत ग्लासाला ओठ लावीत तो दूध पिऊ लागला. वर तिच्याकडे बिलकूल न पहाता मान खाली घालून त्याचं दूध पिणं चालू होतं.

इथल्या अपरिचित वातावरणामुळे पोराला हीव भरल्यासारखं झालं होतं. तरी एवढ्या धावपळीनंतर बंद खोलीतला उकाडा जन्नतला मात्र आता जाणवू लागला होता. घामाने भिजलेल्या अंगाला चोळीकाचोळी फारच काचू लागली. पलंगापाशी जाऊन तिने ती उतरवून टाकली. अंग उघडं होताच तिला खूप बरं वाटलं. त्याचवेळी अंगावरचे कपडेही फेकून देऊन पार नागवं व्हायची तिला जबरदस्त इच्छा झाली. पण पोराची याद आली तशी तिने ती इच्छा आवरली. असं केलं तर अचानक आपल्याला तसे पाहून पोर पार बिथरेल हे ती जाणून होती. अंगावर कापडं होती, तरी तो अजून तिच्याकडे नीट पहायला धजत नव्हता.

हडप्यावर त्याच्या शेजारी येऊन ती बसली. पोर अजूनही तसाच फुंकर घालीत भीत भीत दुधाला ओठ लावीत होता. एक एक घोट घेत होता. या त्याच्या दूध पिण्याची तिला खूप गंमत वाटली... नि ती खूप मोठ्याने हसली.

तिच्या हसण्याने तो एकदम दचकला. त्याच्या हातातला ग्लास डुचमळला. घाईने पुढे होऊन जन्नतने तो त्याच्या हातून घेतला. हातावर सांडलेलं दूध त्याने रूमालाने पुसून घेतलं.

आता तिने पुनः त्याच्या हाती ग्लास दिला नाही. त्यालाच कुशीत ओढून म्हणाली.

"आवो ऽऽ मैं पिलाती हूं ...!"

आणि डाव्या हाताच्या कवेत त्याला सावरून धरून ग्लास तिने त्याच्या ओठी लावला.

तिच्या कुशीत होता तरी अजूनही तो तिच्या चेहेऱ्यावर नजर धरत नव्हता. तिच्या कवेतून सुटका करून घेणं जमणारं नव्हतं म्हणून मुकाटपणे तो दूध पीत राहीला होता. नि असं दूध पिता पिता ग्लासाच्या कडेवरून भिंतीवरल्या क्यालेंडरावर नजर बांधून होता. त्याचं हे असं सारखं सारखं क्यालेंडराकडे पहात रहाणं तिला कौतुकाचं वाटलं. क्यालेंडराच्यात तो एवढं काय पहातोय्.... म्हणून तीही आता क्यालेंडराकडे पाहू लागली.

त्या चित्राकडे पहाता पहाता एकदम तिच्या लक्षात आलं तिथं ती गाय बाळकृष्णाला दूध पाजीत होती आणि इथं ती या पोराला. त्या कल्पनेने उभा देह तिचा शहारून उठला. पोराला आपल्या हाताने असं दूध पाजता पाजता ती त्याच्या चेहेऱ्याकडे एकटक पाहू लागली. तसं पाहता पाहता त्या दृश्यात ती बुडून गेली. वस्तुतः ती स्वतः त्या दृश्याचा एक भाग होती तरीही ती तिची तिलाच त्या दृश्यात अलिप्तपणे पहात राहीली.

हळू हळू त्या दृश्यातला गहिरा रंग तिला निराळीच भूल पाडू लागला. त्यातला अर्थ तिच्यातून व्यापू लागला. ती काय करते आहे हे तिला नीट कळण्यापूर्वीच काही करायला ती उद्युक्त झाली.

त्याच्या तोंडचा दुधाचा ग्लास तिने आता काढून घेतला. हडप्यावर जवळच तो ठेवून दिला. डाव्या दंडावर तोललेली मान त्याची वर उचलून तिच्या खाली अडकलेला पदर सोडवून घेतला. नि मग तो छातीवरून साफच खाली काढला. पदराखालून मोकळे झालेले स्तन तिने त्याच्या चेहेऱ्यावर सांडले.

तिच्या एकाच डाव्या स्तनाखाली त्याचा इवलासा नाजुक चेहेरा झाकून गेला होता. तिच्या धसमुसळ्या वागण्याने विस्कटलेला केसांचा कोंबडा त्या स्तनावरून विखुरला होता. त्या स्तनाचा फुगीर आकार कोरणाऱ्या रेषेआडून त्याच्या नजरेची म्यालेली पाखरं तिच्या नजरेचा वेध घेत होती. त्याच वक्र रेषेवर जरा पुढे त्याच्या नाकाचा शेंडा अलगद टेकला होता. आणि तिथून खाली तिच्या स्तनाग्रापासून अगदीच थोडे अंतर राखून त्याचे लाल पातळ ओठ थरथरत होते. पिता पिता राहून गेलेल्या दुधाचे काही थेंब अजूनही त्या ओठांवर रेंगाळत होते. आणि त्यातलाच एक केव्हातरी तिच्या स्तनाग्रालाही अडकला होता.

आपल्या काळ्या स्तनाग्रावर डवरलेला दुधाचा तो थेंब पाहून तिच्या काळजात विलक्षण कळ उठली. त्या कळीसरशी पोराला जवळ ओढून त्याच्या चेहेऱ्याचे ती मटामट मुके घेत सुटली. या तिच्या भडीमाराने तो विलक्षण गांगरला. हैराण झाला. पण त्याच्या कुठल्याच अवस्थेकडे पहायला तिला आता सवड नव्हती. नुसते त्याचे मुके घेऊनही तिचं समाधान झालं नाही. मग ती त्याचा तो चेहेरा आपल्या स्तनांखाली सारखा सारखा घट्ट घट्ट

आवळत राहिली. पण एवढ्यानेही आग काळजातली विझली नाही. उलट ती आता तिच्या दोन्ही स्तनातूनच भडकून उठली.

डोळे घट्ट घट्ट मिटून घेऊन दाताखाली ओठ चावून जन्नत ती आग साहत होती. पण नेमक्या त्याच प्रयत्नात नको त्या प्रसंगाची याद ती आग अधिकच फुफाटायला कारण होत होती.

कधी एकदा ती खरोखरच पोटुशी राहीली होती. पण एकदाच काय ते टचँ ऽऽ हँ ऽऽ.... करण्यापुरता जन्म घेऊन पोर तिचं संपलं होतं. पोरापुरतं तेही ठीक होतं. पण तिच्यासाठी मात्र काही दिवसपर्यंत भयंकर भोग उरला होता. पोराचे ते टचँ ऽऽ हँ ऽऽ तिला वेळी अवेळी ऐकू येत राहीलं होतं नि मग स्तनांना विलक्षण फूट लागत होती. छातीतली ती वेदना असह्य होत राही.

या क्षणीही तीच जुनी वेदना ती पुन: अनुभवत होती नि छातीशी तिच्या तो पोर होता. डोळे उघडून तिने त्याच्या चेहऱ्याकडे पाहीलं नि आता तो तिला तिनं जन्माल। घातलेल्या अर्भकाइतकाच लहान भासू लागला. स्तनाना स्पर्श करणारी केसांची झुलपं त्याची त्या अर्भकाच्या दाट जावळासारखी वाटली नि कुठल्याही क्षणी त्याच्या थरथरणाऱ्या लाल पातळ ओठातून फुटणारं टचँ ऽऽ हँ ऐकायला ती विलक्षण आतुर झाली. पण आता तेवढी वाट पहाणंही तिला शक्तीबाहेरचं झालं नि पटकन् आपला डावा स्तन उचलून तिने तो त्या थरथरत्या ओठात दिला. पोरही तो स्तन तिचा खरोखरच लुचू लागला. तिच्या स्तनाशी भिडलेल्या ओठांचा तो लुच लुच आवाज ऐकता ऐकता पुन: एकदा जन्नतने डोळे मिटून घेतले.

पोर तिचा स्तन चोखत होता. स्तनाग्रावर अधून मधून दात त्याचे काचत होते नि तिथं विलक्षण भगभग उठत होती. पण या क्षणी यातलं काहीही तिला जाणवत नव्हतं. केवळ एका वात्सल्याच्याच भावनेने या क्षणी ती रोमरोमातून मोहोरून उठत होती. अगदी पाटीला रग लागून तोल सावरणंच तिला अशक्य झालं तेव्हा त्या ऐसपैस हडप्यावरच पोराला तसंच छातीशी धरून ती लवंडली... नि कधी तिथेच तिचा डोळा लागला. झोपेत सुद्धा भुवईपाशी अधुन मधून मुडपणारी एक शीर तेवढी तिच्या स्तनातला ठणका सहन करीत होती नि बाकी गात्रन् गात्र वात्सल्याच्या भावनेनं भिजत राहीलं होतं. कितीतरी वेळपर्यंत त्या सोनेरी स्वप्नात जन्नत मुरत पडली होती.

पण अचानक ओठाना कसला तरी दंश झाल्याचा भास झाला नि त्या स्वप्नातून ती जागी झाली. तिने डोळे उघडले तेव्हा स्तन तिचा पोराच्या तोंडातून दूर झाला होता नि त्याच्या हातांच्या बोटातून तो रुतला होता. आणि हळु हळू तिच्या लक्षात आलं की तिच्या शरीराशीही पोराची काही लटपट चालू होती. क्षणात ती सारं उमजली नि एका लाथेसरशी पोराला तिने दूर उडवलं. भयानक आवाजात ती किंचाळली—

"चल हट दूर..."

बंद खोलीत शिवी तिची विलक्षण घुमली नि त्यातल्या अर्थाने काळीज तिचं पुन: एकदा फटकारून काढलं. जन्नत विलक्षण पिसाळली. तोंडाने घाण घाण शिव्या घालत खाली पडलेल्या पोराला केसांच्या झुलपाना धरून तिने उठवलं नि फाड फाड ती त्याला वाजवीत सुटली. पोर ठोऽऽठोऽऽ बोंबलत नि मोठ्या मुश्कीलीने तिच्या हातून सुटका करून घेऊन दाराची कडी काढून बाहेर धावत सुटलं. दाराशी गोळा झालेल्या बसवण्णा, गुलबी... येस्वदा... म्हातारी यापैकी कुणाच्याही हाती न लागता पार बाहेर पळालं. झालं काय ते नीट कळलं नव्हतं तरी पुन्हा एकदा या घराला शिव्या घालीत बवसण्णा पोराच्या मागून धावला.

पिसाळलेली जन्नत शिव्या घालत अजूनही पोराच्या दिशेने धावत होती.. तिला मात्र आता येस्वदा-गुलबीने धरून आवरलं. ओढत नेऊन पुन:खोलीत ढकललं म्हातारीने खोलीला बाहेरून कडी घालून घेतली.

कितीतरी रात्रपर्यंत त्या बंद खोलीतून जन्नत पोराला शिव्या घालत होती. मग कधी तरी हळु हळू ती थकली नि हडप्यावर येऊन बसली. पदर जाग्यावर नव्हता. स्तन उघडे पडले होते. डाव्या स्तनाला भयानक फूट लागली होती. त्या स्तनाग्रावर जिथं मघा दुधाचा थेंब डवरला होता तिथं आता एक बारीकसा रक्तबिंदु स्रवला होता. काचेच्या नजरेने जन्नत रक्ताच्या त्या थेंबाकडे पहात राहीली होती. ●●●

## रजत महोत्सवानिमित्त 'दीपावली'चे आणखी एक खास आवाहन

# गझल स्पर्धा

**सर्व जुन्या नामवंत कवींना आणि अत्याधुनिक नवकवींना भाग घेण्याची विनंती**

**'दीपावली'कडे येणाऱ्या गझलांपैकी निवडक आठ गझल दिवाळी अंकात प्रसिद्ध होतील आणि त्यातील**

**पहिल्या तीन गझलाना**

**खास पारितोषिके देण्यात येतील**

**स्पर्धेचे नियम:** (१) स्पर्धेसाठी गझल पाठविण्याची शेवटची तारीख १० सप्टेंबर १९६८

(२) नापसंत गझल परत पाठविण्यात येणार नाहीत. त्यासंबंधी कोणताही पत्रव्यवहार करू नये.

(३) संपादकांचा निर्णय अखेरचा मानला जाईल.

**गझल पाठविण्याचा पत्ता: दीपावली कार्यालय, ४०-४२ केनेडी ब्रिज, मुंबई-४**

अनुक्रमणिका











# आवर्ते

### इतिहासकालीन कुटुंबकथा

**ना. व्यं. देशपांडे**

**शिशिर** ऋतूतील गारठा.....एडवर्ड राज्याच्या काळातला......

गारठयाच्या कडाक्याने संवेदना बधीर करून टाकणारा. पण त्यामुळेच, सर्व काही आलबेल आहे याची आश्वासक जाणीव देणारा!

—म्हणूनच त्या अरुंद आळीमध्ये भटांची संस्कृती झोपी गेली होती. गाढ! दिवसा तंत्र-मंत्राची पोपटपंची करून जीभ दमली होती. विधवांच्या केशवपनाची चर्चा आणि चारित्र्याची चिरफाड करून मस्तकात वळवळणारे किडे आता शांत झाले होते. रात्रीची भूक शमल्यामुळे सोवळचा-ओवळचाच्या वादांचे गाठोडे खुंटीला टांगले होते.

आळीमधल्या म्युनिसिपालिटीच्या कंदीलाच्या वाती मंद झाल्या होत्या.

रात्रीच्या घोडेस्वार पोलीसाच्या टापा नुकत्याच वाजून गेल्या होत्या.

कृष्णपक्षातली रात्र होती. अंधार उत्तरोत्तर गडद होत होता.

एक हवेली फक्त जागत होती.

छताला टांगलेल्या हंड्यांतून मेणबत्त्या अद्याप जळत होत्या.

गुरुनाथराव बैठकीवर तसेच बसून राहिले होते. अधून मधून हनुवटीवरील चामखिळीतून उगवलेला एक चुकार केस चिमटीत पकडण्याचा प्रयत्न करीत होते. जानव्यात अडकवलेली तिजोरीची भली मोठी किल्ली जाकीटाच्या खालच्या बाजूने घरंगळत बैठकीच्या गादीवर कलंडली होती. तिच्याकडे नजर जाताच गुरुनाथरावानी तिला प्रेमाने चाचपले. चाचपता चाचपता ते मोठ्याने गडगडून हसले आणि म्हणाले: 'गुरुनाथ, तू शहाणा खरा.'

त्या हसण्याचा प्रतिध्वनी त्या दिवाणखान्यात घुमला. एकदम ते दचकले. आज घरात कोणीच नाही. आपण एकटेच आहोत याची जाणीव त्याना झाली. मग ते उठले. दिवाणखान्याच्या भिंतीवर टांगलेल्या पुरुषभर उंचीच्या भल्यामोठ्या आरशासमोर ते येऊन उभे राहिले. आरशाच्या दोन्ही अंगाला एखाद्या नर्तकीप्रमाणे शरीराला मनोहर बाक देऊन दोन शामदाने उभी होती. त्यातील मेणबत्त्याही अद्याप जळतच होत्या. या भिंतीच्या विरुद्ध बाजूसही असाच एक आरसा आणि अशीच दोन उजळलेली शामदाने. गुरुनाथराव आरशासमोर उभे राहिले आणि त्याक्षणी अनेक गुरुनाथराव निर्माण झाले. लहानलहान होत जाणारे गुरुनाथराव. त्यांना एकदम बरे वाटले. ते आपल्या प्रतिबिंबाकडे पाहू लागले. त्याच्या पाठीमागील दुसऱ्या प्रतिबिंबाकडे निरखू लागले. नंतर तिसऱ्या. नंतर चौथ्या. अगदी दिसेनाश्या ठिपक्या पर्यंत त्यांची नजर वेध घेऊ लागली. पुनः एकदा ते गडगडून हसले. आरशातल्या प्रतिबिंबाकडे पाहात ते पुनः म्हणाले: 'गुरुनाथ, तू शहाणा खरा.'

त्या सर्व परावर्तित प्रतिबिंबानी तोंडाची तशीच हालचाल केली. त्यांच्या शहाणपणाची पोच मिळाली. त्याना बरे वाटले.

त्यानी आपल्या मिशांच्या आकड्याना उगीचच पीळ दिला. डोक्यावरची कानटोपी कानाभोवती नीट सरकवून घेतली आणि ते तिजोरीकडे वळले.





अनुक्रमणिका

**गुरुनाथरावांचे डोळे जडावले. पापण्यांच्या केसांपाशी झोप ओठंगून राहिली. भविष्याच्या सुखावह कल्पनेने ते मोहरून गेले....सारे संरक्षिले जाणार आहे....अबाधित राहणार आहे....साहेब लोकांची कृपा ! आता झोपायला पाहिजे....गाढ. कशाची चिंता नको....आणि पलंगापाशी येताच ते दचकले....**

तिजोरी आतल्या खोलीत–झोपायच्या खोलीत–होती. भल्या मोठ्या उंच नक्षीदार शिसवी पलंगाशेजारी मेजावर एक स्टँड मंदपणे जळत होता. वात आत ओढल्यामुळे त्यावरची गिरणीच्या घुरांड्यासारखी असणारी काच उठून दिसत होती. गुरुनाथरावांनी वात सरकवावयाची किल्ली फिरवून वात किंचित् उंचावली. दिवा लखलखू लागला. किंचित् थरथरत्या हाताने त्यांनी दिवा उचलला. कुठेतरी खडबडल्याचा भास झाला. ते एकदम दचकले. मग त्यांनी कानोसा घेतला. पुन: सर्व शांत झाले. दबकत ते तिजोरीकडे पाऊल टाकू लागले. भिंतीमध्ये तिजोरी ठेवण्यासाठी नुकतेच एक भगदाड पाडून भिंतीतले कपाट तयार करण्यात आले होते. पाडलेल्या ठिकाणी गिलावा वगैरे करून झाला होता. दाराची चौकटही बसवून झाली होती. आता बिजागऱ्या बसवून दारे एकदाची लावली की झाले. त्या अर्धवट कामाकडे पाहून त्यांनी हणमंता सुताराला एक चक्क शिवी हासडली. 'शिंच्याचे कामच असे दीर्घसूत्री' असे काहीसे पुटपुटत त्यांनी जानव्यातील किल्लीने आतील तिजोरीचे दार उघडले.

हातातील दिवा जमिनीवर ठेवून आतल्या दागिन्यांकडे ते एकटक पाहात बसले. हिऱ्यांचे, माणकांचे, मोत्यांचे अन् सोन्याचे तऱ्हेतऱ्हेचे दागिने वेगवेगळ्या पेट्यांमधून ठेवले होते. दूध उतास यावे त्याप्रमाणे त्यांचे समाधान काठोकाठ ओसंडून आले. त्यांचा हात अभावितपणे हनुवटीवरील चामखिळीतल्या केसाला चाचपू लागला. 'गुरुनाथ, तू शहाणा खरा.' ते पुटपुटू लागले. मग एका कोपऱ्यातून त्यांनी मोत्याचे एक पेंडे बाहेर काढले. एकेक मोती अस्सा टपोरा होता. परिपुष्ट लसणाच्या पाकळीवर असतो तसा लालसर तजेलदारपणा प्रत्येक मोत्यामधून प्रतीत होत होता–आणि मधला तो हिरवा पाचूचा खडा ! आपण कोठल्या गावात असताना आपण हे घेतलं बरं? ते आठवू लागले. कोणत्या प्रकरणात तो आपणाला लाभला हे त्यांच्या लक्षात येईना. ते उगीचच एकेक मोती निरखू लागले. जणू देणाऱ्याचे नांव त्यांनी कोरले होते त्यावर. पेंडे ठेवून दिल्यानंतर त्यांनी चिंचपेटी काढली. प्रत्येक चौकोनावर जडवलेले हिऱ्याचे खडे चमचम करीत होते. त्यांचा चेहेरा उजळून आला. चिंचपेटी जेव्हा मिळाली त्यावेळचे प्रकरण त्यांना आठवले. महाचिकट मनुष्य तो. कामच तसले महत्त्वाचे होते म्हणून ही चिंचपेटी आली. नाहीतर ताकास तूर लागू दिला नसता. एकवार डोळे भरून सगळीकडे पाहिल्यानंतर त्यांनी चिंचपेटी जागेवर ठेवून दिली. तिजोरीचे दार बंद केले. कुलूप नीट लागले आहे की नाही हे पाहण्यासाठी त्यांनी दारावरची मूठ नीट हलवून पाहिली. मग ते उठले. दिवा पुन: पूर्वीच्या जागी ठेवला व ते बाहेर पुन: दिवाणखान्यात आले.

त्यांना झोप येत नव्हती. बैठकीवरील लोडाला टेकून ते विमनस्कपणे बसले. दिवाणखान्यातला एकाकीपणा त्यांना बोचू लागला. मघाशी ओसंडून आलेले समाधान कोठल्याकोठे लुप्त झाले आणि भयानक पोकळी त्यांना अस्वस्थ करू लागली. याच बैठकीवर त्यांनी अनेक ब्राह्मणांशी वितंडवाद घातले होते. त्यांच्या कर्मठपणाचा उपहास केला होता. पुराणातील भाकडकथांच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडवल्या होत्या. त्यांच्या ढेरपोटेपणाची आणि खादाडपणाची रेवडी उडवली होती. वादामध्ये त्यांना निरुत्तर करू शकलो याचा त्यांना अभिमान वाटला होता. सारी मालकम्साहेबांची कृपा. किती चर्चा करायचा तो आपल्याशी ! केवढी मोठी बुकं वाचायला दिली होती त्यांनी. उगाच नाही त्यांनी राज्य चालवलंय् आपल्यावर? मालकम्साहेबांबरोबर चर्चा करून, त्यांनी दिलेली बुकं वाचूनच नाही का आपण ते बुक लिहिलं ? बुकाची आठवण होताच त्यांचे ओठ संतापाने थरथरले. याच बुकाची आपल्या आळीतील ब्राह्मणांनी गुपचुपपणे होळी केली होती. पाखंडी म्हणून उपहास केला होता. पण सारे पाठीमागे. एकाची कुणाची टाप नव्हती तोंडासमोर बोलायची. भिक्षुकांची आठवण करता करता त्यांना तो काळा ब्राह्मण आठवला. दक्षिणेतून आला होता वाटतं. नेहमीप्रमाणे आपण त्याची टवाळी केली. पण तो चिडला नव्हता. त्याला दक्षिणेची आशा नव्हती. दिसायलाही रोड होता तो. आपण आपल्या बुकातली सगळी मतं घडघड बोलून दाखविली त्याला. पण त्याने एक मार्मिक प्रश्न विचारला जाता जाता—

"स्वामी, वादाकरिता मी तुमचं सगळं मान्य करतो. आम्ही नुसते पोपटपंची करणारे. एकदम कबूल. सार्वजनिक कामासाठी, भौतिक उन्नतीसाठी, संपत्तीचा विनियोग केला पाहिजे तर आपला देश संपन्न होईल हे सगळे मला वादाकरिता मान्य आहे. आपण उत्तम वेव्हार करून धन जोडले आहे असा बोलवा आहे. यापैकी कोणता हिस्सा सार्वजनिक कामाकरिता खर्च केला आहे किंवा करणार आहात?"

गुरुनाथराव घोटाळले होते. त्यांना उत्तर सुचेना. मग काहीतरी अवसान आणून ते म्हणाले होते, "हो, हो! अद्याप जरी खर्च केला नसला तरी योजना आहे मनात. अजून काही मेलो नाही मी. पेन्शन

घेतली म्हणून काय झालं?"

त्यानं नुसतं स्मित केलं.

शंकराचार्यांची चर्पटपंजरी गुणगुणत तो निघून गेला. उगाचंच अस्वस्थ करून गेला.

त्या काळचा ब्राह्मणाची आठवण आज—आता या घटकेला उगाचंच अस्वस्थ करून गेली. आज सहा वर्षं उलटून गेली होती त्या गोष्टीला. या काळात आपण कसली योजना केली? काय केले? आपले अवसान उसने होते काय? आपण बोललो ते सत्याला स्मरून होते काय? कुणासाठी आपण हा वेव्हार केला? वरा असो, वाईट असो, धन जोडले. चार पिढ्याना ददात राहणार नाही एवढी इष्टेट केली. कुणासाठी? दामूसाठी.....वंशाचं सातत्य राहावं....

दामूची आठवण येताच, एकाएकी हवा गेलेल्या फुग्यासारखे त्यांचे मन आक्रसून गेले. हनुवटीवरील चामखिळीतला केस पकडण्यासाठी हाताची बोटे चाचपडू लागली. मग त्याना कायसे आठवले. बैठकीच्या उजव्या बाजूस असलेली शिसवी पेटी त्यानी उघडली. आत नक्षीदार चंदनाची एक सुबक लहान पेटी होती. ती न उघडताच ते क्षणभर ती निरखीत राहिले. त्या छोटयाशा चपटया चंदनी पेटीवर कृष्णाची लतापल्लवानी वेष्टित अशी मनोहर मूर्ति कोरली होती. कृष्णाचा एक पाय नृत्याच्या झणत्कारासाठी किंचित् वर उचलला होता. त्या पायाखालीच त्याच्या भोवतीच्या लतेची एक शाखा अर्धवर्तुळ घेत खाली आली होती आणि तिच्या शिखेला एक गोंडस कळी! कळी गोंडस होती की श्रीकृष्णाचा तळवा? ठरवणे कठीण होते. गुरुनाथराव तसेच तल्लीन झाले....मग भानावर आले.....

काय हा हव्यास...? कसला हा छंद ......? जी जी देखणी वस्तू आपल्या नजरेस पडली ती ती आपण हस्तगत केली.... कशाकरता? संपत्तीचा अट्टाहासाने साठा केला? कशाकरता ?

गुरुनाथराव दचकले...आसपास पाहू लागले. आज अमावास्या...घरात कोणी नाही......एक विकट कल्पना त्यांच्या मनात डोकावून गेली....या संपत्तीच्या अभिलाषेने कोणी आपला गळा दाबून खून केला तर? ....मग ते खरेच घाबरले. गळचाभोवती कोणाची तरी बोटे उमटलीत की काय या शंकेने गळचाभोवती त्यानी आपला हात फिरवला...त्यांच्या हातून चपटी चंदनी पेटी गळून पडली. तिचा आवाज ऐकताच ते भानावर आले. झटकन् तिचे झाकण उघडून आतील चिटोरे बाहेर काढले. थरथरत्या हाताने ती चिठ्ठी उलगडून दामूची कुंडली पाहात बसले. फल ज्योतिषावर त्यांचा विश्वास नव्हता; पण एका कातर वेळी, कातर क्षणी एका मित्राच्या सल्ल्यावरून त्यानी कुंडली करून घेतली होती. ज्योतिषाने शक्य तितक्या गोड शब्दात सांगितले होते, 'या पत्रिकेचा गुण आहे तो उपभोगशून्यता! नुसती एकटयाने बाग फुलवून भागत नाही. तिची मशागत नीट झाली पाहिजे....बाकी तसं ठीक आहे!'

त्यानी पुन: ती चिठ्ठी नीट घडी करून ठेवली. चंदनी पेटीला झाकण लावून त्या शिसवी पेटीत टाकून दिली.

'एकजात लबाड असतात ज्योतिषी. कुणालाही दुसऱ्याचं चांगलं झालेलं बघवत नाही...काहीतरी भयसूचक सांगायचं आणि अमुक उपाय करा....तमुक उपाय करा म्हणून पैसे उकळायचे...फार पूर्वीपासून डाव ओळखून आहे मी...' ते आपल्याशीच पुटपुटले.

तरीही त्यांचे मन स्थिरावले नाही. दामू......दामू......तू असा कां निपजलास?

कॉलेजात तुझं मन रमलं नाही, हरकत नाही. पण घराकडे लक्ष दे...कसला तुला छंद लागलाय्? कसली विकृती जडलीय् तुला? तुझ्यासाठी हा सारा डोलारा उभा केला. तुझ्यासाठी त्या माळावर आंबराई फुलवली. नाना तऱ्हेच्या फळांची झाडं लावली. या म्हातारपणाला अजूनही दररोज दोन वेळा जाऊन येतो तिथं...गडीमाणसं नीट कामं करतात की नाही, गोबरपाणी व्यवस्थित दिलं जातं की नाही हे स्वतः जातीनं पाहतो...कशाची ददात पडणार नाही रे तुला.....

कशाला माझ्या जाकिटातलं ते सुंदर सोनेरी घडचाळ चोरलंस आणि माणिकचंद मारवाड्याला विकलंस? काय मिळालं तुला? अन् त्या पैशाचं केलंस काय? उंची कपडे, अत्तरं आणि एका रात्रीचं नायकिणीचं गाणं! माझ्याजवळ पैसे मागितले असते तर दिले नसते का? अत्तरं खरेदी करायची जरूरीच काय होती? माझ्या अल्मारीत अत्तरांची पेटी आहे तुला ठाऊक नव्हतं का? गाण्याची तुला आवड खरोखरीच आहे...तर मग मी तुला हार्मोनियम शिकवायला सुरू केला असता तू कंटाळून कां जायचास?

...कशात काय, कुठे विनसले ते समजत नव्हते. आपण फार लाड केले का? छे! उलट एकाद्या क्षुल्लक चुकीपायी गुरासारखे बडवून काढले होते! अगदी कडक शिस्त आपली. आपल्या आकडेबाज करारी मिशांप्रमाणे....

मग एकेक आठवणी ते आठवू लागले... आपण त्याच्याकडे खरोखरीच लक्ष दिले का? ऐन नोकरीत सोन्याची एकेक लगड जमवीत असताना आपल्याच नादात गुंग होतो....एकेक सुंदर वस्तूंचा संग्रह करीत असताना आपल्याशीच धुंद होतो... साहेबाचं तत्त्वज्ञान पचवीत असताना आणि आपल्या संस्कृतीला ठोकरीत असताना आपण बेफाम होतो. त्यावेळी दामूची आठवण होती का?...

दामू....आज घडचाळ विकलंस.... उद्या माझे लिहिण्याचे सुंदर नक्षीकामाचे शिसवी मेज फुंकून टाकशील. कवडीमोल किंमतीने...आंब्याला किती मोहोर आला आहे हे न पाहताच आंबराईचा लिलाव करून टाकशील. माझ्याच हाताने गवताची काडी काडी जमवून रचवलेलं सुंदर घरटं....उस्कटलेलं पाहवणार नाही मला....

पण असं निराश व्हायचं तरी काय कारण? माझ्या आयुष्याची दोरी अजून









अनुक्रमणिका

ढिली झाली नाही. अजून काही वर्षं जगणार आहे मी....दामूला नीट केलेच पाहिजे...तो मार्गावर आलाच पाहिजे. मुंबईच्या डॉक्टराला दाखवून नुकताच आणलाय् त्याच्या सासऱ्यानं! बघूया डॉक्टरी इलाजाचा काही उपयोग होतोय् का?

आपल्या व्याह्याची आठवण होताच गुरूनाथरावांचे गांगरलेले मन क्षणकाल स्वस्थ झाले. पुन: त्याना आपल्या शहाण-पणाचा कैफ आला. दामूच्या लग्नाच्या वेळी इतिहासातल्या पानांचे दाखले त्यांच्या नजरेसमोर फडफडले होते. कर्तृत्वशून्य पोराला चाणाक्ष, पाणीदार सुनेच्या दावणीला बांधले की डळमळणारी घरे स्थिर होतात...चंचल लक्ष्मी जेरबंद होते....दाही दिशाना लोंबकळणारे अवलक्षणी दोर कापले जातात.

दामू काय करीत असेल सासुरवाडी? आपल्या सासऱ्याची जरब त्याला बसली असेल काय? सूनवाई त्याला वठणीवर आणील काय? शहाणी आहे सूनवाई.... सांभाळून घेईल त्याला.....आणि या घराला.......

सूनबाईची आठवण होताच गुरुनाथ-रावांचा हात अभावितपणे चामखिळीतल्या केसाकडे गेला. चाचपडणाऱ्या बोटाना तो केस अचूक सापडला. भरल्या समा-धानानं ते पुन: पुटपुटले...'गुरुनाथ तू शहाणा खरा!'

संपत्तीच्या अभिलाषेनं आलेल्या अनेक थोरामोठ्यांच्या मुली त्यानी नाकारल्या होत्या...शेवटी स्वत:च्या परीक्षेने दामू-साठी ही सूनवाई निवडली होती.

परवाच गावातल्या काही खादीधारी मंडळीनी आपल्याला लुवाडण्याचा केवढा धूर्त घाट घातला होता! कॉलेज काढणार म्हणे हे दिवटे! त्यासाठी त्याना आंबराईची जागा आणि बंगला हवा होता.

मला ठाऊक आहेत त्यांचे डावपेच. आमच्या दामूची परिस्थिती त्याना ठाऊक आहे...हे गृहछिद्र त्यानी जाणलं होतं म्हणून मर्मावर आघात करण्यासाठी लेकाचे मागणी करायला आले होते.

एकानं तर मानभावीपणानं माझ्या बुकाची स्तुती तोंडभरून केली. म्हणतो कसा?....'गुरुनाथरावजी, आपण पृष्ठ ९० वर केलेली चर्चा किती उद्बोधक आहे! खरंच आपल्यासारखे पाच पन्नास विचारवंत जर समाजात जन्मले आणि त्यांचे विचार समाजाने पचवून घेतले तर आपला देश स्वतंत्र होण्यास फार उशीर होणार नाही....समाजातील अंधार काढून टाकण्यासाठीच आम्ही हा ज्ञानाचा दीप उजळणार आहोत. आपण प्रतिपादलेल्या आवडत्या मतांचे स्वप्न पुरे होणार आहे आमच्या या योजनेने.. तेव्हा....'

अरे चोरा! मागे माझ्या बुकाची होळी झाली त्यात तुझा हात होता हे मला नक्की माहीत आहे...

चार दिवसानी विचार करून काय ते सांगतो असे सांगून त्याना आपण वाटेला लावले.

त्याची आठवण होताच गुरुनाथराव उठले. घड्याळाकडे पाहिले. बारा कधीच वाजून गेले होते. आतल्या खोलीतला स्टँड त्यानी बाहेर आणला. कोपऱ्यात भिंतीला लागून एक शिसवी काळेकुळीत आणि शाळिग्रामाप्रमाणे तुकतुकणारे लांब-रुंद मेज होते. त्यावर स्टँड ठेवला. मेजाच्या तिन्ही कोपऱ्यांच्या कंगोऱ्यांवर द्राक्षांचे घोस कोरले होते. मेजाचा तोल दोन नक्षीदार मोरांच्या डोक्यानी सावरला होता. पायांचे खूर सिंहाच्या भक्कम पंजा-सारखे बनवले होते. मेजाचा पाठचा भाग भिंतीला टेकला होता. मागचा संपूर्ण भाग काळ्या नक्षीदार फळीने बंद केला होता. सूर्याची किरणे चहूबाजूला फेकली जावीत त्याप्रमाणे कोरीव, रेखीव काळी किरणे त्या मेजाच्या चारी कोप-ऱ्यांचा आणि अंगाचा वेध घेत होती.

गुरुनाथरावानी मेजावरचा कागद पुढे ओढला. समोरचे हस्तीदंती कलम-दान त्यानी घेतले. शिऱ्याच्या काळ्या शाईत टाक बुडवला आणि वळणदार मोठ्या, ठसठशीत मोडीमध्ये ते लिहू लागले....

'सार्वजनिक कार्याच्या माझ्या स्वत:च्या काही योजना मनात आहेत. त्यासाठी लौकरच काहीतरी कार्य सुरू करण्याची मनीषा आहे. सबब आपली मागणी मला स्वीकारता येत नाही याबद्दल खेद होतो.'

झोकदार सही करण्यास सरावलेल्या बोटानी त्यानी झर्कन् सही करून टाक परत कलमदानात खोचून ठेवला तेव्हा त्याना मोठे समाधान झाले. 'गुरुनाथ, तू शहाणा

# कादंबरी स्पर्धा

## मुदतवाढ नाही, क्षमस्व!

**आगामी रजत-महोत्सवाच्या निमित्ताने 'दीपावली'ने आयोजित केलेल्या कादं-बरी–स्पर्धेची मुदत दि. ३० जूनला संपली. ही मुदत वाढवून मिळावी म्हणून अनेकानी पत्रे पाठवून अगर टेलीफोनवरून विनंती केली; पण कादंबरी–स्पर्धा म्हणजे काही शब्दकोडे नव्हे, की त्याची मुदत वारंवार वाढविण्यात यावी.**

**या स्पर्धेसाठी चाळीसवर कादंबऱ्या आल्या असून त्यांची परीक्षक–मंडळाकडून तपासणीही सुरू झाली आहे. स्पर्धेचा निर्णय दिवाळी अंकात जाहीर होईल आणि पहिल्या क्रमांकाची कादंबरीही त्याच अंकात प्रसिद्ध करण्यात येईल. याबाबत कृपया कोणीही पत्रव्यवहार करू नये.**

**–संपादक**





अनुक्रमणिका

खरा' असे आपल्याशी पुटपुटत ते तेथून उठले. आरशासमोर पुनः उभे राहिले. आपली परावर्धित प्रतिबिंबे भरल्या मनाने पाहात राहिले.

त्यांच्या मनातले वादळ आता शमले होते. मघाच्या औदासिन्याची कळा हळुहळू अस्तंगत होऊ लागली. काळ्या ब्राह्मणाची अस्वस्थ करणारी आठवणही बुझली. त्याना आत्मविश्वास आला. हे भले मोठे जंगी आरसे मलीन होणार नाहीत, हंड्या झुंबरे सदैव पुसली जातील, लखलखीत राहतील. या शिसवी फर्निचराचे नक्षीकाम बिघडणार नाही. त्यांचे काळे तुकतुकीत पॉलीश सदैव तुकतुकीतच राहील. आपण संग्रहीत केलेल्या नक्षीदार चंदनाच्या पेट्या सदैव सुगंध पसरवीत राहतील. समारंभातून आपले दागिने मिरवीत राहतील. या सुंदर हस्तीदंती कलमदानातून कदाचित रसिक अक्षरे उमटतील....माळावर फुललेली आंबराई अधिक मोहरेल. हिरवा चाफा नाक कोंदून टाकील. माकडे लटकल्याप्रमाणे फणसाच्या झाडावर गरानी भरलेले फणस लटकतील, काजूची बोंडे आणि गुल्मोहोर एकमेकांशी रंगीत स्पर्धा करतील. नागपंचमीच्या सणी नाती आणि मैत्रिणी चिंचाच्या झाडांना दोरांचे झोपाळे टांगून गगनविहार करतील. माळावरच्या बंगल्यात नातसूनेची मंगळागौर सजेल... पूजेला फुलाना पत्रीना तोटा राहणार नाही....

गुरुनाथरावांचे डोळे जडावले. पापण्यांच्या केसांपाशी झोप ओठंगून राहिली. भविष्याच्या सुखावह कल्पनेने ते मोहरून गेले...सारे संरक्षिले जाणार आहे... अबाधित राहणार आहे....साहेब लोकांची कृपा! आता झोपायला पाहिजे... गाढ. कशाची चिंता नको.

मेजावरचा लखलखणारा स्टॅंड थरथरत्या हातात घेऊन ते झोपण्याच्या खोलीत जावयास निघाले.

पलंगापाशी येताच ते दचकले.

एक चकचकीत धारदार सुरा त्या लखलखीत प्रकाशात तळपत होता.

त्यांच्या पलंगाशेजारी हणम्या सुतार तारवटलेल्या नजरेने पाहात उभा होता!

●●●




# निरागस प्रेमकथा

—राजेन्द्र बनहट्टी



**वास्तविक** मिस् पांगारे ही माझ्या ऑफिसातली एक सामान्य कारकून. आफिसातील इतर अनेक कारकुनांप्रमाणे तीही एक. आता ती कामात हुषार होती, तिचे अक्षर चांगले होते, टायपिंगमध्ये तिचा हातखंडा होता, डिक्टेशन घेण्यात तिची क्वचितच चूक होत असे, हे सर्व कबूल केले पाहिजे. पण तसे पाहिले तर इतर सर्व क्लार्कस् आपआपले काम उत्कृष्टपणे करीत होते. तिच्या शेजारी बसणाऱ्या भातखंडेच्या तोंडावर देवीचे वण होते; चष्म्याची भिंगे इतकी जाड होती की त्याने डोळ्याला दुर्बिण लावली आहे असे वाटे. याला सर्व गोष्टी दुर्बिणीतून पाहिल्यासारख्या मोठाल्या दिसतात की काय असे मला कधी कधी वाटे. पण या भातखंड्याचे ड्राफ्टींग असे नेटके आणि अक्षर इतके रेखीव की ड्राफ्ट टायपिंगला न देता तसाच पाठवावा असे वाटे. पांगारेच्या समोर बसणारा काटकुळा भिंगारेही हिशेबात वाकबगार. त्याच्या उजव्या हाताला कायमचा कंप असे. हीव भरल्यासारखा हात नुसता बसल्या बसल्या थडथडत असे त्याचा. पण त्या हाताने केलेल्या लाखो रुपयांच्या बेरजा-वजावाक्यात त्याने कधी पैशाची चूक ठेवली नाही. तर सांगायचा मुद्दा हा की मिस् पांगारेप्रमाणेच सारेच क्लार्कस् आपआपल्या कामात तयार होते.

आता आणखी म्हणजे पांगारे माझी सेक्रेटरी होती. डिक्टेशन घ्यायला अनेक वेळा ती माझ्या केबिनमध्ये येत असे. रोजचे महत्वाचे टपाल तिने माझ्या टेबलावर आणले की मी तिला त्याचे डिस्पोजल् सांगत असे. तिचा माझा जास्त वेळ आणि जास्त वेळा संबंध येत असे, यात शंका नाही. पण तसे इतर साऱ्याच कारकुनांशी माझे चांगले संबंध होते. म्हणजे जसे पांगारेशी होते तसेच होते. संबंध म्हणजे काय तर ऑफिसच्या कामापुरते, ऑफिसच्या वेळातले. म्हणजे तसे विशेष संबंध नव्हते असे म्हटले तरी चालेल.

एक गोष्ट मात्र कबूल केली पाहिजे. रोज सकाळी मी आलो की माझ्या केबिनच्या दारापलीकडे बसणारी पांगारे उठून मला म्हणत होती,

"Good Morning, Sir!"

इतर लोक उठून उभेही राहत नसत आणि गुडमार्निंगही म्हणत नसत. मी कोणाकडून तशी अपेक्षाही केली नव्हती. म्हणून






**मिस् पांगारे म्हणजे एक मामुली स्टेनो; ना सौंदर्य ना आकर्षक व्यक्तिमत्व ! ऑफिसातल्या इतर कारकुनां-प्रमाणेच साहेबांचे तिच्याशी अलिप्ततेचे संबंध होते. त्यानी तिची वैद्यकीय तपासणी करवून घेण्याची व्यवस्था केली आणि मुंबईला जाण्यासाठी स्वतःकडचे तीनशे रुपये दिले....पण कां....ते कळलेही नाही !**

पांगारेचे हे एक वैशिष्टच म्हणा पाहिजे तर. ती आपली रोज न चुकता कळ फिरल्यासारखी उभी राहत होती नि म्हणत होती–

"Good Morning, Sir."

नाकबूल करण्यात अर्थ नाही. प्रथम जरा मी विचकलो तरी नंतर मला तिच्या शुभेच्छांची सवय झाली. इतकेच नव्हे पुढे पुढे मला एकदम बरे वाटू लागले. मोटारीतून उतरल्यावर नेहमी विचारात मान खाली घालून झपाझप मी दाराशी केव्हा येई ते कळत नसे. पण तेवढ्यात कानावर शब्द पडत "गुडमॉर्निंग, सर !"

अचानक माझ्या चेहऱ्यावर हलकेसे का होईना, पण हास्य पसरे. नकळत मान हलवून केबिनचे दार उघडून मी आत प्रवेश करी. खरे म्हणजे यात देखील विशेष असे काय होते ? बऱ्याचशा सेक्रेटरी बॉस दाराशी आला की उठून त्याचे स्वागत करतात, हे मी पाहिले होते. पण पांगारेने उठून शुभेच्छा व्यक्त करताच माझ्यातला 'बॉस' थोडासा तरी सुखावत असावा, हे निश्चित. शिवाय पांगारेचा आवाज मोठा गोड होता. सामान्यतः साऱ्याच स्त्रियांचे आवाज मृदू असतात, जात्याच पुरुषांपेक्षा त्यांच्या आवाजात अधिक कोमलता असते, हे सर्वांना माहित आहे. प्रथम प्रथम माझ्या लक्षात आले नाही, पण नंतर हळू हळू मला कळले की पांगारेचा आवाज नुसता गोड नाही. काहीतरी वेगळा आहे. तिचा आवाज पातळ, हलका नव्हता. तिचे शब्द जड असत. ते खोलातून आल्यासारखे घुमत असत. बोलताना जणु श्वास लागल्यासारखे तिचे शब्द स्पंदन पावत असत. थकून भागून आल्यावर बोलल्यासारखे. तिचा आवाज निश्चितच रुंद आणि जाड होता पण तरीही तो गोड होता. इंग्रजीत त्याला कदाचित 'हस्की' म्हणता येईल. दररोज ऐकून तिच्या आवाजासंबंधी माझे हे मत झाले होते.

दिसायला म्हणाल तर पांगारे अगदी सामान्यच होती. कोणाच्याही डोळ्यात ती भरली नसती. रंगाने तर ती काळीसावळी होतीच पण अंगानेही खुजी आणि रोड. तिला मुळी कसले व्यक्तिमत्वच नव्हते. निदान माझ्यातरी ते प्रथम लक्षात आले नाही. ऑफिसातले टेबल, खुर्ची, कपाट, टाइपरायटर, या वस्तूंप्रमाणेच ती एक वस्तू होती. वास्तविक आमच्या कंपनीत तिला नेमले कसे याचे कोणालाही थोडेसे आश्चर्य वाटले असते. कारण आजकाल मोठमोठ्या कंपन्यातल्या सेक्रेटरी तर कशा सिनेमाच्या पोस्टरातल्या-सारख्या भडक असतात. सुंदर म्हणा हवे तर. मोठ्या कंपन्यात सेक्रेटरी नेमताना त्यांच्या सौंदर्याचा विचार केला जात असला पाहिजे. पांगारे आमच्या कंपनीत कशी काय नेमली गेली कुणास ठाऊक. तीन चार वर्षांपूर्वी जेव्हा आम्ही नवीन स्टाफ घेतला तेव्हा इंटरव्ह्यू बोर्डात मी होतो. त्यावेळी दहाबारा स्त्रिया आम्ही कंपनीत स्टाफवर घेतल्या. त्यातच ही पांगारे असणार. झाली असली तर स्टेनोग्राफीतल्या तिच्या मेरीटरवरच तिची अपॉईंटमेंट झाली असणार.

कोणी म्हणेल की माझ्या ऑफिसातल्या एका मामुली क्लार्क-संबंधी, तिच्या कामासंबंधी, तिच्या आवाजासंबंधी रूपासंबंधी मी इतका विचार कसा केला. पण खरेच सांगतो की हा सर्व विचार मी प्रथम केला नाही. मी सांगणार आहे ती गोष्ट घडल्यानंतर हा सारा विचार माझ्या डोक्यात आला. त्यापूर्वी मिस् पांगरेबद्दल मी कधी कसलाही विचार केला नाही. तसे काही कारणच नव्हते. ऑफिसातल्या इतर स्टाफप्रमाणे तीही एक. तिचा आवाज, तिचे रूप कशाकडेच माझे लक्ष गेले नाही. मी रोज ऑफिसात येताच ती उठून म्हणत होती "गुड मॉर्निंग सर." असले तर तेवढेच माझ्या लक्षात होते. हे मात्र ती कधी विसरली नाही. तिने मला 'विश' करताच मी हात किंवा मान हलवून स्मित करत असे आणि माझे झुलते दार उघडून आत जात असे. पुढे पुढे तिच्या तोंडून शब्द येताच माझ्या तोंडून शब्द जाऊ लागले. "गुड मॉर्निंग" पण हे सारे आपोआप, यांत्रिकपणे. नंतर तर मला त्याची सवय झाली. इतकी की एक दिवस मी आल्यावर नेहमीप्रमाणे म्हटले "गुड मॉर्निंग" आणि आत गेलो. पण नंतर माझ्या लक्षात आले की पांगारेचे शब्द मी ऐकलेच नाहीत. मी पाहिले तर तिची खुर्ची रिकामी होती.

मिस् पांगारेची सिकनोट आली होती. पांगारे तीन वर्षे तरी माझ्याबरोबर काम करत होती. या काळात ती काही दिवस निश्चितच गैरहजर राहिली असणार. हक्काच्या सुट्याही तिने घेतल्या असणार. पण तिने कधी सिकनोट पाठविली होती की नाही, हे आठवत नाही. बहुधा नसावी. ऑफसातला दुसरा स्टेनो सोनक याने त्यादिवशी पत्रे आणली. डिक्टेशन घेतले. सोनकला माझ्या बोलण्यातल्या खाचाखोचा, लकबी, विचारांची लय माहीत नव्हती. त्यामुळे तो जरा गडबडला. त्याने चुका केल्या. माझी थोडी अडचण झाली. पांगारेने माझ्या कामाच्या सर्व सवयी आत्मसात् केल्या होत्या. पत्रांचे सॉर्टिंग कसे करायचे, पत्रे कुठे ठेवायची, कोणती पत्रे कशी टाईप करायची, इतकेच नव्हे तर डिक्टेशन कुठल्या खुर्चीवर बसून घ्यायचे, हे सारे तिला माहित होते. मी थोडा कुठे बाहेर गेलो की टेबलावरचा कागदांचा पसारा आवरलेला असायचा. जेथला कागद तिथे जायचा. फुलदाणीतील फुले लावलेली असायची. खिडक्यांची ब्लाईंडस्ची

देखील चढत्या किंवा उतरत्या उन्हाप्रमाणे उघडझाप केलेली असायची. परत केबिनमध्ये येताच पुन्हा कसे सगळे स्वच्छ, नेटके, प्रसन्न वाटायचे. सोनकला हे सर्व जमणे शक्यच नव्हते, हे अगदी साहजिकच होते. त्यादिवशी मला हे काहीच जाणवले नाही. पण मिस् पांगारेनंतर ओळीने चार दिवस आली नाही. इतकेच नव्हे तर त्यानंतर ती दर चार-आठ दिवसानी दोन तीन दिवस गैरहजर राहू लागली. तेव्हा मात्र मला जाणवले की पांगारेला जशी माझी सवय झाली होती, तशी मलाही पांगारेची सवय जडली होती. टेलिफोन बंद पडला की कसे नडते ? पेनमधील शाई संपली की कसे अडते ? तसे माझे पांगारेशिवाय नडू लागले. कामात जो एक ओघ, सुसंगत प्रवाह असायचा तोच मुळी तुटक तुटक झाल्यासारखा वाटू लागला. टेलिफोन, टेबल, खुर्ची, फुलदाणीतली फुले, इतकेच काय पण खिडक्यांची विशिष्ट रीतीने उघडलेली स्लाईडस्, त्यातून येणारा प्रकाश व उरलेला अंधार यांची जशी अजाणता सवय जडते, तशी पांगारेची मला सवय जडली होती. जाणवली नव्हती इतकेच.

पण ही जाणीव झाल्यावर तर पांगारेला तिच्या सारख्या गैरहजेरीबद्दल विचारणे मला भाग होते. आता पांगारे मुळातच आजाऱ्यासारखी फिकट दिसत असे. आवाजही खोल, कधी कधी कण्हल्यासारखा. त्यामुळे सिकलीव्हवरून परत आल्यावर तिच्यात तसा काही फरक आढळत नसे. तिचे डोळे अधिक खोल गेलेले असावेत. चेहरा थोडा अधिक ओढलेला दिसत असावा, बोलताना उसासे अधिक दीर्घ टाकले जात असावेत. पण एकदम जाणवण्यासारखी तिची प्रकृती खालावलेली दिसत नव्हती.

अखेर एके दिवशी दुपारी डिक्टेशन संपल्यावर उठून ती बाहेर जाउ लागली, तोच मी विचारले—

"मिस् पांगारे, तुम्ही अलिकडे बऱ्याच ॲबसेंट राहता आहात?"

"आय ॲम् सॉरी सर."

"पण व्हॉट इज दी ट्रबल ?"

पांगारे काही बोलली नाही. तिची मान खाली होती.

"तुम्ही ट्रीटमेंट घेताहात ना ?"

"हो. सर, पण डॉक्टरनी अजून काही निदान केलं नाही."

"पण काय होतंय् तुम्हाला एक्झॅक्टली ?"

पांगारे काही क्षण थांबली.

"पोट दुखतं. डोळ्यासमोर अंधेरी येते."

याठिकाणी पांगारे थरथरल्याचा भास झाला. भिंतीवरची तिची फिकट, कृश सावली हलली.

"This is not going to help you. तुम्ही एखाद्या स्पेशॅलिस्टला कन्सल्ट करा."

पांगारे परत शांत.

"तुम्ही सध्या कोणाची ट्रीटमेंट घेता आहात ?"

"डॉ. पांडे म्हणून आहेत. आमच्याच आळीत."

"तुम्हाला वाटलं तर मी डॉ. रानड्यांना चिठ्ठी देतो. He is a well-known specialist".

"पण. . . . ."

"डोन्ट वरी. शक्य असलं तर कंपनी मेडिकल एक्सपेन्स देईल. तशी प्रोव्हीजन आहे."

"Thank you, Sir!"

☆☆

पांगारे केव्हातरी माझ्याकडून डॉ. रानड्यांकरिता चिठ्ठी घेऊन गेली. ती नंतर रानड्यांकडे गेली किंवा नाही आणि गेली असल्यास केव्हा गेली, हे काहीच मला कळले नाही. तिची गैरहजेरी पूर्वीप्रमाणेच चालू होती. तिची सर्व रजा भराभर संपत असावी. कारण एस्टॅब्लिशमेंट डिपार्टमेंटकडून पांगारेच्या एकसारख्या गैरहजेरीचा जाब विचारणारा एक मेमो मध्येच केव्हातरी माझ्याकडे सहीसाठी आला होता. शेकडो कागदपत्रावर सह्या करता करता या मेमोवर मी सहीही केली होती, हे आता आठवते. एकदोनदा ऑफिसातून अर्ध्या दिवसाची रजा घेऊनही पांगारे गेली होती, हे मात्र माझ्या लक्षात त्यावेळीच आले. कारण एकदोनदा तिला मी बोलावले तर सोनक आत येऊन हजर.

"मिस् पांगारे. . . ."

"त्या घरी गेल्या. तब्येत ठीक नाही म्हणून."

"ओः! "

पण तरीदेखील पांगारेच्या प्रकृतीची चौकशी मी कधी केली नाही. एकतर त्यावेळी कंपनीच्या वार्षिक सभा जवळ आल्या होत्या. निरनिराळ्या डायरेक्टर्सना शेकडो गोष्टींची माहिती द्यावी लागत होती. मिटींग्जची तयारी करण्यात इतर कसल्याही गोष्टींचा विचारसुद्धा करण्यास मला वेळ मिळत नव्हता. स्टेटमेंटस्ची चवड टेबलावर लागली होती. दिवसेंदिवस फायलींचा ढिगारा वाढत होता. सह्या करता करता हात मोडून येत होते. घरी जायला रात्रीचे आठ आठ वाजत होते. शिवाय दुसरे असे की












पांगारे मधून मधून गैरहजर असली तरी जरूर लागली त्यावेळी बहुधा ती ऑफिसात हजर होती. त्यामुळे मी डॉ. रानडयांना चिठ्ठी दिली होती, हे देखील थोडेबहुत विसरून गेलो होतो.

आणि अशा हातघाईत कागदांच्या ढिगाऱ्यात बुडालेलो असताना एके दिवशी डॉ. रानडे यांचा मला फोन आला. ऑपरे-टरने सांगितले,

"Dr. Ranade is on the line, Sir!"

मला प्रथम एकदम काही उलगडा होईना. रानडयांकडे त्यावेळी माझी कसलीच केस नव्हती. थोडयाशा संभ्रम अवस्थेतच मी रिसीव्हर कानाशी लावला.

"हॅलो !"

"डॉक्टर रानडे बोलतोय्."

"बोला डॉक्टर."

"तुम्ही त्या मुलीला माझ्याकडे पाठविलंत. . . "

"मुलगी ?"

"मिस् पांगारे."

"ओ : !"

"ती मुलगी तुमची कोण आहे ?"

रानडयांच्या या अनपेक्षित प्रश्नाने मी एकदम जागा झालो. एकदम उत्तर न देता मी सावधपणे विचारले.

"कां डॉक्टर ?"

"नाही म्हणजे तुमच्या नात्यातली-रिलेशनपैकी ती आहे काय ?"

"पण तुम्ही हे कां विचारताहात डॉक्टर ?"

"मी तिला तपासलं."

"I see."

"She . . . तिला कॅन्सर आहे."

"कॅन्सर !"

एकदम माझ्या तोंडून मोठयांदा शब्द पडला. त्याच वेळी केबिनचे झुलते दार हलल्याचा भास झाला. कां कोण जाणे माझ्या पोटात अचानक गोळा उठला. आश्चर्य असे की त्यानंतर लगेच डॉक्टर दोन तीन वाक्ये बोलले. पण टेलिफोनमध्ये एकदम काहीतरी बिघाड झाला आणि फोन काही क्षणच डिस्कनेक्ट झाला. मला डॉक्टरांची ती वाक्ये काही ऐकू आली नाहीत. आता विचार करतो तेव्हा वाटते की त्यावेळी टेलिफोन डिस्कनेक्ट झाला नसावा. मी स्तिमित झालो होतो, त्यामुळे माझे कान काही क्षण बधीर झाले असावेत. त्यामुळे डॉक्टरांची ती वाक्ये मला ऐकू आली नसावीत. त्या वाक्यात कॅन्सर कशा प्रकारचा आहे हे डॉक्टरांनी सांगितले असावे. कारण पुढे मला त्यांचे शब्द ऐकू आले.

"तेव्हा मी तिला सांगितलं आहे की तुम्हाला मुंबईला जायला पाहिजे. But it will be very expensive."





अनुक्रमणिका

कसे बोलायचे हे मला लवकर सुचेना. अनेक ड्राफ्टस् मी मनातल्या मनात तयार केले. पण एकही पसंत पडेना. आणि ट्यूबच्या लख्ख प्रकाशाने उजळलेल्या माझ्या केबिनमध्ये मी अंधारात बसल्यासारखा गप्प बसून राहिलो.

अखेर डॉक्टरानी विचारलेला प्रश्नच मी विचारला. पांगारे माझी कोण होती ? ती माझी कोणीच नव्हती. तिच्याशी माझे रक्ताचे, शरीराचे, मनाचे, विचारांचे कसलेच नाते नव्हते. तिचा माझा काहीच संबंध नव्हता. पहिल्यांदा सांगितले त्याप्रमाणे इतर स्टाफप्रमाणे तीही एक होती. खरेच ऑफिसव्यतिरिक्त तिचा माझा संबंधच नव्हता. असण्याचे काही कारणच नव्हते. झट्दिशी तिला थोडक्या शब्दात डॉक्टरांचे निदान सांगून मोकळे व्हावे. मी सुटलो आणि तीही सुटली. सारा प्रश्नच सुटला.

दुसऱ्या दिवशी मी ऑफिसात आलो. केबिनच्या दाराबाहेरच नेहमीप्रमाणे बसलेली मिस् पांगारे मला दिसली. तसे पुढे टाकलेले पाऊल क्षणभर हवेत तरंगल्यासारखे झाले. जणु ते जमिनीवर टेकणारच नाही, असा अविश्वास वाटला. मी येताच तिचे शब्द आले,

"गुड मार्निंग सर."

चेहरा चुरमडल्यासारखे माझे हास्य उमटले. मी आत गेल्या-वर थोड्याच वेळात महत्त्वाची डाक घेऊन पांगारे आत आली.

आश्चर्य असे की पांगारे त्यादिवशी खुशीत दिसत होती. तिच्या ओठावर किंचितसे हसू होते. डोळे खोल गेलेले होते पण त्यात चमक दिसत होती. कधी नव्हे ती तिने लिपस्टिक लावली असावी, असा मला संशय आला. झटपट तिने पत्रांचे सॉर्टिंग केले. फाईली काढून ठेवल्या. उत्तरे देण्यासाठी पत्रांचा क्रम लावला. तिच्या हालचालीत उरक होता, उत्साह होता. असहाय-पणे मी तिची हालचाल पाहत होतो. तिला खुर्चीवर बसायला सांगावे आणि मग बोलावे. एकदम सारे सांगून टाकावे. पण अचानक तीच बोलली. तिच्या नेहमीच्या घुमणाऱ्या 'हस्की' आवाजात. पण तिच्या शब्दात एकदम चैतन्य वाटले. जोष वाटला. इतका की मी एकदम चपापलो.

"सर, मी डॉ. रानड्यांकडे गेले होते."

"आय सी. मग ?"

"डॉक्टरांनी सांगितलं की काही विशेष नाही."

मी बोललो नाही. समोरचा कागद वाचण्याचा प्रयत्न केला.

"थोड्याच दिवसात बरं वाटेल."

मी अर्थातच परत शांत. कागदावरची अक्षरे किंचित् पुसट झाली.

"मात्र एकदा लवकर मुंबईला जऊन तपासून घ्या असं म्हणाले डॉक्टर. मुंबईच्या हॉस्पिटलचा पत्ता दिला आहे त्यांनी. पत्रही दिलं आहे."

माझे ओठ घट्ट मिटलेलेच. मात्र अक्षरे अजिबात दिसेनाशी झाली.

"मुंबईला तपासून ट्रीटमेंट घेतली की मग अजिबात बरं वाटेल, असं डॉक्टरानं सांगितलं. सध्याकरिता त्यानी काही औषधं दिली. दोनतीन दिवस ती घेते आहे मी. त्यामुळे बरं वाटतं."

मिस् पांगारेला बोलता बोलता दम लागला. मी हातानेच तिला बसायला सांगितलं. पण ती बसली नाही. पुढे वाकून तिने एकदम टेबलावर हात टेकले.

"सर, Request आहे. मुंबईला जाऊन येण्यासाठी मला रजा पाहिजे. पंधरा ते वीस दिवस. आल्यानंतर मी परत कधी रजा घेणार नाही. एकदा मी ठीक झाले की वाटेल तेवढे काम करीन. पाहिजे तितका वेळ बसेन. पण एवढी Request Consider करा. This is my last request."

पांगारे पहिल्यांदाच माझ्याशी इतके बोलली होती. गेल्या तीनचार वर्षात ती इतके कधीच बोलली नव्हती. दोनचार शब्दांपेक्षा जास्त बोलण्याचा प्रसंगच कधी आला नव्हता. आणि तिचा स्वभाव तसा बोलका नव्हताच. इतर काही स्टाफ कामा-पेक्षा जास्त उगीच काहीतरी बोलत असे. पण पांगारे कामाखेरीज कधीच एक शब्द जास्त बोलली नव्हती. ऑफिसात इतर स्टाफशी बोलतानाही कधी मला ती दिसली नव्हती. कामातच ती सदैव गढलेली असायची. म्हणूनच ती इतकी बोलली याचे मला प्रथम आश्चर्य वाटले. पण आता जेव्हा मी विचार करतो तेव्हा मला तिच्या बोलण्याचे आश्चर्य वाटत नाही. कारण तो तिचा शेवटचा प्रयत्न होता.

मिस् पांगारेला मी परत खुर्चीवर बसण्याची खूण केली. ती यावेळी बसली. डिक्टेशनसाठी तिने पॅड हातात घेतले.

"मिस् पांगारे, तुम्ही राहता कुठे ?"

माझ्या अनपेक्षित प्रश्नाने ती चकित झाल्यासारखी दिसली.

राजकीय 'लघु'कथा




पुण्यात म्युनिसिपल निवडणुकांत शिवसेनेचे हे 'असे' झाले

"I see."

"म्हणून मी तुम्हाला विचारलं की ती तुमची कोण आहे ? आणि to be frank मुंबईला जाऊन देखील विशेष फायदा नाही."

"म्हणजे ?"

"It's too late now. Only one chance in hundred. आणि तो चान्स घेणं हेही फार costly आहे."

"इतकी ती सीरीयस आहे ? She seems to be normal."

"You see, it is now a matter of time. ती आता नॉर्मल आहे. ती कदाचित दोन महिने जगेल. कदाचित चार महिने. If she is lucky सहा महिनेही जातील. But there is no escape. Her fate is sealed."

"You mean, it can't be cured."

"I don't mean that. मी तुम्हाला सांगितलं की there is only one chance in hundred आणि तोही तीं मुंबईला गेलो आणि योग्य ट्रीटमेंट तिला मिळाली तर. आणि मी तुम्हाला सांगितलं आहे की ट्रीटमेंट is very expensive, and there is lot of risk."

"तुम्ही तिला हे सांगितलं का डॉक्टर ?"

"नाही. मी तिला फक्त सांगितलं की तुम्ही मुंबईला जाऊन तपासणी करून घ्या."

"आणखी ?"

"एवढेच सांगितले. आणखी काय सांगणार ? मी तिला सांगू शकत नाही की तुमचे आयुष्य संपले आहे. I can't do that to any patient, because you know आशा काही सुटत नाही !"

"अच्छा डॉक्टर, Thank you."

"I am sorry."

मी फोन खाली ठेवल्यानंतर नक्की काय केले हे आता आठवत नाही. पण त्यादिवशी पांगारे आलेली नव्हती. त्यामुळे मला थोडे हलके वाटले, हे मात्र खरे. डॉक्टर रानड्यांकरित। मी तिला चिठ्ठी दिली होती ती सहज म्हणून. दयेची, ममतेची, आपुलकीची कसलीही भावना त्यावेळी माझ्या मनात नव्हती, हे नक्की. तिने लवकर बरे व्हावे ही कुठल्याही ओळखीच्या माणसाबद्दल वाटणारी सामान्य भावनाच तिला चिठ्ठी देण्यामागे असावी. पण नकळत सहज पाय पुढे टाकावा आणि तो दलदलीत जाऊन खोल रुतून बसावा तसे माझे झाले. मिस् पांगारेला कॅन्सर झाला होता, तो आता कधीच बरा होऊ शकणार नव्हता, पांगारे आता फारच थोड्या दिवसांची सोबती होती. तिचे आयुष्य संपुष्टात आले होते, हे रहस्य मला अकस्मात् कळले होते. पण आश्चर्य असे की पांगारेबद्दल मला कसलीच माहिती नव्हती. तिला आई-वडील, भाऊ-बहीण, नातेवाईक आहेत की नाहीत, असलेच तर कुठे आहेत, काय करतात, हे काहीच मला ठाऊक नव्हते. असण्याचे कारणच कधी पडले नव्हते. आणि तिची कसलीच माहिती नसताना तिच्या जीवनाचे सर्वात मोठे रहस्य अचानक माझ्यासमोर येऊन आदळले होते. आता हे रहस्य माझ्याजवळ ठेवणे इष्ट नव्हते. तसे ते मी ठेवू शकणार नव्हतो. कारण हे तिचे रहस्य होते. फक्त तिला आता हे केव्हा व कसे सांगावे हाच प्रश्न होता. आणि हा प्रश्न पहिल्यांदा सोपा वाटला तरी तो फारसा सोपा नाही, हे मला लगेच कळले. मागे माझी म्हातारी आजी जगणे शक्य नाही, हे मला एकदा डॉक्टरानी सांगितले होते. पण नंतर आजी प्रत्यक्ष मरण पावली तरी सुद्धा मी ते आजीलाच काय पण इतर कोणालाही सांगू शकलो नव्हतो. मिस् पांगारे तर तरुण होती. नक्की वय मला कधी कळले नाही पण तिशीच्या आत ती असावी. शिवाय, ती नोकरी करत होती. त्याअर्थी तिच्यावर अवलंबून असणारी माणसे तिच्या घरी असणार. मिस् पांगारेचे सारे आयुष्य अजून तिच्या समोर होते. तिचे लग्न व्हायचे होते, तिला मुले व्हायची होती. आयुष्याचा संपूर्ण डाव अद्याप तिला खेळायचा होता. परन्तु खरे पाहिले तर तिला सारे सांगणेच तिच्या फायद्याचे होते. नाहीतर ती मुंबईला गेली असती. कुणाचे तरी कर्ज काढून, कसेतरी पैसे जमवून. निराशा घेऊन परतली असती. घोर निराशा. त्या निराशेपासून तरी तिला वांचवलेच पाहिजे. आणि ते माझ्या हातात होते. शिवाय ती तरुण होती, तिचे लग्न, मुलेबाळे, संसार अद्याप व्हायचा होता, हेही एका दृष्टीने बरेच होते. नव्या पाशात अडकण्यापूर्वीच ती जाणार होती, डाव सुरू होण्यापूर्वीच जाणार होती, हे दुःखात एकच सुख होते. पण तरीही मिस् पांगारेला हे रहस्य सांगायचे कसे हा प्रश्न मुळात उरलाच. कोणत्याही माणसाला तो आता मरणार हे सांगणे नाही म्हटले तरी क्रूरपणाचे वाटते. पांगारे तर माझ्या ओळखीची होती. दिवसाचे आठ तास माझ्याबरोबर काम करत होती. तीन चार वर्षे माझी सेक्रेटरी म्हणून काम करून तिने माझी मर्जी संपादन केली होती. आता ती मरणाच्या दारात उभी आहे हे तिला एकदम सांगायचे म्हणजे चांगलेच अवघड काम होते. शक्य तितक्या मऊ, शांत, प्रेमळ शब्दात तिला हे सांगायला हवे. लगेच तिची अत्यंत दुःखाने क्षमा मागायला हवी. तिला सखोल सहानुभूती दाखवायला हवी. पण शब्दांची जुळवाजुळव करणेही वाटते तितके सोपे नाही, हे मला कळले. कुठले शब्द वापरायचे,

## युद्धकथांसंबंधी

**भारतीय सेना विशेषांकासाठी आलेल्या साहित्यापैकी ब्रिगेडियर वि. ल. साठे यांच्या "जया देव तारी' चा उत्तरार्ध, भारतीय तोफखान्यावर आधारित युद्धकथा आणि ब्रिगेडियर निजानंद बाळ यांच्या युद्धकाळातील आठवणी हे साहित्य काही अपरिहार्य कारणामुळे प्रसिद्ध होऊ शकले नाही— क्षमस्व ! हे साहित्य यापुढील अंकातून यथावकाश प्रसिद्ध होईल.**

**–संपादक**

हॉस्पिटलमध्ये तपासणी करून घेऊ शकली नसती. आणि तिला कधीच कळले नसते की तिचे आयुष्य सरले आहे. माझ्या मनात अशी इच्छा असावी की तिने मुंबईला जावे, तपासणी करून घ्यावी, म्हणजे तिला कळेल की ती मरणाच्या दारात उभी आहे आणि मी सुटेन.

पण नवल असे की तिला पैसे देऊनही माझी सुटका होऊ शकली नाही. मी पैसे दिल्यानंतर एकदोन दिवसातच मिस् पांगारे बिनपगारी रजेवर गेली. ती मुंबईला उपचारासाठी गेली असणार आणि रजा संपताच परत रुजू होणार असे साहजिकच मला वाटत होते. पण रजा संपली तरी ती रुजू झाली नाही. त्याऐवजी तिचा राजीनामा माझ्या टेबलावर आला. तिचा राजीनामा पाहून मला आश्चर्य वाटले. खरे म्हणजे तसे वाटायला नको होते. कारण लवकरच एकतर तिला राजीनामा द्यावा लागणार किंवा कंपनी तरी तिला नोटीस देऊन कायमची रजा देणार हे मला उघड उघड दिसत होते. थोडक्यात म्हणजे ती या ऑफिसातून लवकरच जाणार हे मी ओळखले होते. पण तरीही पांगारेने परस्पर मला न भेटता राजीनामा पाठविला याचे मला राहून राहून नवल वाटत होते. निदान तिने मला एकदा तरी भेटायला पाहिजे होते. काय झाले ते मला सांगायला पाहिजे होते. पण ती मला न भेटता, न सांगताच निघून गेली होती. आणि आता कदाचित् मला कधीच भेटणार नव्हती. भेटू शकणार नव्हती.

पण अशी घालमेल चालली असतानाच एके दिवशी दुपारी केबिनचे दार उघडून पांगारे भुतासारखी आत आली. माझा भुताखेतांवर विश्वास नाही. पण खरेच सांगतो, त्यादिवशी मिस् पांगारे आत आली आणि टेबलाजवळ उभी राहिली. केबिनचे दार उघडल्याचा किंवा तिच्या पावलांचा आवाजच मला ऐकू आला नाही. मी खाली मान घालून कामात गर्क होतो. मध्येच वर पाहतो तो समोर मिस् पांगारे उभी. मी कमालीचा दचकलो. क्षणभर मला वाटले की हे पांगारेचे भूत आहे. आणि माझा श्वास एकदम आत ओढला गेला. पांगारे खरोखरी भुतासारखी दिसत होती. तिचा चेहरा पांढराफटक पडला होता. हात पांढुरके दिसत होते. डोळे खोल गेले होते. तिचा सारा जीवनरस जणु आटून गेला होता.

तिने शंभराच्या तीन नोटा टेबलावर ठेवल्या.

"हे काय ?"

"सर, हे तुमचे पैसे."

तिचा आवाज अगदीच संथ आणि खोल होता. बुडणाऱ्या माणसाचा तो आवाज होता.

"पण, हे परत कशाला आणलेत ?"

"मी मुंबईला गेले नाही सर."

"काय म्हणता ?"

"डॉ. पांड्यानी मला सारं सांगितलं."

"सारं ?" माझ्या गळ्यात झालेला आवाज मला अजून आठवतो.

"सारं. ते म्हणाले मुंबईला जाऊन आता काही फायदा नाही."

"ओ : ! I am sorry."

ती फिकट हसली. माझ्यासमोर पहिल्यांदाच हसली. तिचे पांढरे-शुभ्र दात मला दिसले.

"म्हटलं मरताना कोणाचं देणं नको."

"पण हे देणं नाही, मिस् पांगारे. You must know. तुम्ही हे ठेवा. तुम्हाला उपयोगी पडतील."

"नको सर. नको. हे ओझं आणखी नको."

काय बोलावे मला क्षणभर कळले नाही. पण फार बोलावेसे मात्र वाटत होते.

"तुम्ही रिझाईन का केलं ? आता. . . . "

"कंपनी मला नोटीस देणारच होती. आज ना उद्या."

"मग आता ?"

"घरी जमेल तेवढं टायपिंगचं काम करते. चारपाच वकीलांची कामं मिळतात."

"पण हे कशाला ? तुम्ही विश्रांति घ्या. खरंच, You must take rest."

"आयुष्य संपलं आहे हे कळलं सर. पण म्हणून लगेच मरता येत नाही. प्रत्यक्ष मरण येईपर्यन्त तरी जगायला हवं ना ?"

ती परत हसली. यावेळी मोठ्याने. आणि हसता हसताच उठली.

"अच्छा सर. Thank you."

मला मुक्त करून ती उठली. सरळ दारावाहेर पडली. तिला थांबवावे, तिच्याशी बोलावे असे फार वाटले, हे नक्की. माझ्या लहानपणी जत्रेच्या वेळी गॅसचे फुगे मिळत. हा फुगा हातातून निसटला की वरवर आकाशात हळू हळू जात असे आणि मग लुप्त होत असे. डोळ्यांना तो जाताना दिसे पण पकडता येत नसे, थांबवता येत नसे. कारण हातातून तो निसटलेला असे. मी लहानपणी असे अनेक फुगे उघड्या डोळ्यांनी गमावले. मिस् पांगारे दारावाहेर पडताना मला दिसली. तिला थांबवावे, तिच्या मागे जावे असेसुद्धा वाटले. पण मी तिला थांबवू शकलो नाही. तिला थांबवण्यात काहीच अर्थ नव्हता. आणि तिला थांबविण्याची शक्ति आता माझ्यात नव्हती. तिच्यात नव्हती. ती कोणातच कदाचित् नव्हती.

मिस् पांगारे त्यानंतर मला कधीच भेटली नाही. तिचे पुढे काय झाले हेही मला कधी कळले नाही. तिच्या जागी थोड्याच दिवसात मिस् डिसूझा आली. तंग फ्रॉक घालणारी ही गोरीपान उफाड्याची मुलगी फारच हुषार होती. तिच्या शरीराचा सेंट आत आला की केबिनमध्ये पसरायचा. येस् सर, नो सर नाजूक ठसक्यात म्हणायची. दिवसातून चारवेळा तरी पावडर लिपस्टिक लावत असली पाहिजे. कारण दरवेळी तिचा चेहरा कसा ताजा, प्रसन्न दिसायचा.

पण तरीही तिला डिक्टेशन देताना मी कधी कधी म्हणायचो.

"मिस् पांगारे, Now take down."

"मिस् डिसूझा, सर."

"Oh, I am sorry." ●●●



अनुक्रमणिका

पण तिने शांतपणे पत्ता सांगितला.

"तुमचे आईवडिल ?"

परत तिच्या भुवया विस्फारल्या, नजर किंचित् ढवळली गेली.

"वडील नाहीत. आई माझ्याजवळच असते."

"भाऊबहिणी ?"

ही शिरगणती कां चालली आहे. याचा उलगडा न झाल्याने तिचा चेहरा भांवावल्यासारखा झाला. पण तिने पुढे प्रश्न विचारण्यास जागाच ठेवली. नाही.

"तीन भाऊ आहेत. दोन बहिणी. सारे माझ्यापेक्षा लहान आहेत. सर्वात मोठा भाऊ यंदा मॅट्रिकला बसेल. बाकीचे सारे शिकताहेत."

"You are the only earning member?"

"Yes Sir."

"पण तुमचा भाऊ नोकरी करू शकेल. नाही का ?"

"नाही सर."

"नाही ?"

"त्याला मी नोकरी करू देणार नाही. त्याला मी खूप शिकवणार आहे. तो फार brilliant आहे. नेहमी त्याचा पहिला नंबर असतो."

"ओ : !"

यापुढे मी काही बोलणे अशक्य होते. समोरच्या कागदांची चाळवाचाळव करण्यापलीकडे मी काही करू शकलो नाही. डिक्टेशन आता नाही, नंतर बोलवीन असे मी तिला सांगितले. ती जायला निघाली तसे मी म्हटले:

"तुमच्या leave चे मी पाहतो. I am not directly concerned. Establishment Dept. चे ते काम आहे. पण I shall see, what I can do."

"Thank you, Sir."

मिस् पांगारेचा रजेचा अर्ज लवकरच माझ्या टेबलावर आला. तो मी रेकमंड करून पाठविला. पाठोपाठ तिचा ॲडव्हान्ससाठी अर्ज माझ्याकडे आला. तो येणार हे मी ओळखले होतेच. कारण मुंबईला जायचे तर पैशाची व्यवस्था तिला करावी लागणार होतीच. हा अर्ज रेकमेंड केला तर त्यात कंपनीचे उघडउघड नुकसान होणार, हे मला माहीत होते. कारण ॲडव्हान्स फेडायला पांगारे जिवंत राहिली असती की नाही याची मला शंका होती. आणि तिच्यानंतर तो ॲडव्हान्स फेडणार कोण ? उघडचा डोळ्यानी कंपनीचे नुकसान करणे म्हणजे कंपनीला एकप्रकारे फसविणेच होते. मिस् पांगारे जाणार होती, पण मी कंपनीत राहणार होतो, या जगात राहणार होतो. मला आता नवल वाटते ते माझेच. एकीकडे मी इतका कोरडा अलिप्त विचार करत होतो. आणि दुसरीकडे पांगारे आत आली की माझे आसन डळमळीत होत होते. ऑफिसचे सारे काम, माझी ती प्रशस्त दिमाखदार केबिन, ते चकचकीत ऐटबाज टेबल, ती फिरती गुबगुबीत खुर्ची—सारे अस्थिर, अवास्तव वाटत होते.

कारण लवकरच पांगारेची रजा मंजूर झाल्याचा एस्टॅब्लिशमेंटचा मेमो माझ्या टेबलावर आला. रजा विनपगारी होती. हे अपेक्षितच होते. कारण तिची सर्व रजा संपली होती. ॲडव्हान्सचा अर्जही अपेक्षेप्रमाणेच रिजेक्ट झाला. मिस् पांगारेला दोन्ही मेमो मिळाले तरी ती माझ्याकडे त्यादिवशी आली नाही. ती येईल माझी अशी अपेक्षा होती. अर्ध्या दिवसाची रजा घेऊन ती घरी गेली की काय अशी मला शंका आली. मी बेल वाजवली आणि तिला बोलावले. मी ठरवले की तिला सारे सांगून टाकायचे. आता हीच नेमकी वेळ आहे. डॉक्टर रानडे यांचे निदान जाणण्याचा खरे म्हणजे तिचा हक्क होता. आता तिला अधिक काळ अज्ञानात ठेवायचे नाही, असा मी तडकाफडकी निर्णय घेतला.

पण पांगारे आत येऊन उभी राहिली आणि सारे बदलले. क्षणार्धात तिच्या अस्तित्वाची छाया माझ्यावर पडली.

"मेमो मिळाले का तुम्हाला मिस् पांगारे ?"

"Yes Sir."

"मग आता काय ठरवलं आहे तुम्ही ?"

"कशाबद्दल सर ?"

"मुंबईला जाण्याबद्दल !"

"आता कसं जाणार. ते सारं राहिलंच."

"कां ? You can borrow some money!"

"मी आतापर्यन्त कर्ज काढलं नाही. एका पैचंही. सारं घर चालवलं पण कोणापुढे पैशासाठी. . . ."

"हं !"

येथपर्यंत काहीतरी ठीक चालले होते. पण यानंतर मात्र मी विक्षिप्तपणाच केला. खिशातून शंभराच्या तीन नोटा काढून मी तिच्यापुढे केल्या.

"मिस् पांगारे हे कर्ज समजू नका. मदतही समजू नका. जमल्यास परत करा. केले नाहीत तरी चालतील."

"नाही. नाही. सर, हे मी घेणार नाही."

"मिस् पांगारे, Don't be a fool. तुम्हाला मुंबईला जायलाच पाहिजे. You must go and get the treatment. तुमच्या भल्यासाठी मी सांगतो आहे."

पण तरीही पांगारेने पैशाला हात लावला नाही.

"You Take this. This is an order."

तिने नोटा घेतल्या. काही न बोलता ती बाहेर गेली.

मी दिलेले तीनशे रुपये ती परत देऊ शकणार नाही, हे मला माहित होते. तरीही मी ते दिले होते. माणुसकीच्या, दयेच्या भावनेने मी तिला ते पैसे त्यावेळी दिले असतील. केवळ मदत म्हणूनही दिले असतील. पण आता विचार करतो तेव्हा मला वाटते की तिला पैसे देण्यात माझाही एक स्वार्थ होता. तिला पैसे जमविता आले नसते तर ती मुंबईला कदाचित् जाऊ शकली नसती.




ले. जनरल एस्. पी. थोरात
माजी लष्करी प्रमुख (पूर्व विभाग)

# ना गां चा वि ळ खा

*नागा प्रदेशाचे माजी लष्करी प्रमुख (पूर्व-विभाग सेना प्रमुख) म्हणून लेफ्टनंट जनरल थोरात यांनी काही काळ नागा प्रदेशाची समस्या उकलण्यात हातभार लावला होता. त्यांच्याकडून नागांच्या प्रश्नाचे स्वरूप समजण्यास मदत होणार असल्याने त्यांची 'दीपावली'चे प्रतिनिधी श्री. यशवंत दातार यांनी खास मुलाखत घेतली होती. त्यावेळी त्यांनी व्यक्त केलेले विचार...*

**नागालँड** म्हणून ओळखले जाणारे आसाम व पूर्व-पाकिस्तानला लगत असे हे राज्य एके काळी आसाम प्रांताचा भाग गणले जात असे. ब्रह्मदेशला त्या टापूची सरहद्द भिडलेली असल्याने दुसऱ्या महायुद्धात त्या टापूला लष्करी धोरण व हालचाली यांच्या दृष्टीने फार महत्व आलेले होते. भारत-ब्रह्मदेश जोडणारा लष्करी खुष्की वाहतुकीचा "बर्मा-रोड" बांधण्यात आला तोही याच टापूतून जाणारा होता.

नागा जिल्ह्याची शिरगणती (१९५०–५१ साल) सुमारे साडेतीन लक्ष असून संपूर्ण नागा जनता एकूण वीस टोळ्यांतून विभागली गेलेली आहे. त्यापैकी अंगामी, सेना, आओ व कोन्याक या चार प्रमुख टोळ्या होत. एक काळ असा होता की नागा म्हणजे पिढीजात खून–मारामाऱ्या असे समीकरण रूढ होते. कां? कौटुंबिक व आंतर टोळी भांडणे हा शेकडो वर्षांचा वारसा मनुष्यवधाचे रूपाने तसाच चालू होता, म्हणून! नागा जिल्हा इतका डोंगराळ आहे की दळणवळण व वाहतुकीची साधने तेथे नाहीतच असे म्हणणे वस्तुस्थितीला धरून आहे. दळणवळणाची साधने नसल्याने तेथील टोळ्यांचा एकमेकांशी घनिष्ठ असा संबंध विसाव्या शतकातसुद्धा स्थापन होऊ शकलेला नव्हता. त्याना शिक्षण नव्हते. स्वतःची अशी लिपी नव्हती. मुक्त जीवन, शिकार, सूड घेण्यासाठी खून करणे, भूतपिशाच्च, चेटके याना भिऊन वागणे हेच नागा–सामाजिक जीवनाचे स्वरुप विसाव्या शतकाच्या प्रारंभीसुद्धा कायम होते.

भारताचा तावा ईस्ट इंडिया कंपनीकडून ब्रिटिश सरकारकडे आल्यानंतरही सुमारे पन्नास पाउणशे वर्षे त्या भागात पाऊल टाकण्याचे धाडस मिशनऱ्यानीसुद्धा केले नव्हते. उत्तरपूर्व आसाममधील पर्वतांच्या उतारावर चहामळ्यांची लागवड सुरू होण्याच्या सुमारास ख्रिश्चन मिशनरींनी आपला मोर्चा त्या भागाकडे वळविला. दुसऱ्या शब्दात असे सांगता येईल की ब्रिटिशानी सरकारीरीत्या एकदा शासनाची प्राथमिक घडी घालून दिली रे दिली की मिशनरी लोक त्यांचे पाठोपाठ त्या त्या प्रांतात जाऊन लोकांची मने मारण्याचे, त्यांची स्थानिक संस्कृती नष्ट करून त्यांच्यामध्ये बौद्धिक व मानसिक गुलामगिरी बिंबविण्याचे काम सुरू करीत असत. नागालँडमध्ये तशी पोटाची ददात नव्हती; परंतु रोगराई भूतबाधेने होते, असले काही शेकडो वर्षांचे समज असल्याने औषधोपचार करून घेणे, आधुनिक शिक्षण, समाजव्यवस्था याबाबतीत नागा समाज भारतातील इतर लोकांपेक्षा किमान दोन शतके अधिक मागे राहिला. त्यातच वर्षाला दीड दोनशे इंचापर्यंत कोसळणारा बारमाही पाऊस, दाट जंगल आणि रस्त्यांचा

अभाव यामुळे तो समाज तसाच उपेक्षित रहाण्यास निसर्गानेही एकापरीने हातभारच लावला होता.

## ब्रिटिश राजवट व नागा

ब्रिटिशांच्या काळात नागालॅंड म्हणजे तेव्हाचा नागा जिल्हा हा "नागा हिल्स डिस्ट्रिक्ट" म्हणून ओळखला जात असे. त्या पूर्ण विभागासाठी एकच कलेक्टर होता आणि त्याच्या दिमतीला तुरळक तुरळक असे अधिकारी होते. ते लोक नागांच्या दैनंदिन जीवनात हस्तक्षेप करीत नसत. तेथील खरी सत्ता प्रत्येक खेड्याच्या प्रमुख माणसांच्याच हाती होती. त्या लोकांची तुलना आपल्याकडील पाटलांशी करता येते. त्यांना "गांवबुढा" या नावाने ओळखत असत. त्यांचेकडे सोपविलेले मुख्य कार्य दोन प्रकारचे होते. पहिले म्हणजे काळा वा गोरा कारकून किंवा साहेब त्या टापूत वावरत असल्यास त्याच्या जीवाची हमी घेणे आणि शेजारच्या ब्रह्मी किंवा इतर टोळचानी हल्ला केल्यास त्याची माहिती ताबडतोब सरकारकडे कळवून शत्रूला पिटाळण्यासाठी नागा लोकानी लढणे. मुख्यत्वेकरून धनुष्य बाणांचा वापर, पात्याला विष लावलेले भाले कोयत्याहून मोठे पण दाट जंगलातील प्रचंड वृक्षही खचाखच उडविता येऊ शकतील असे तीक्ष्ण हत्यार यांचे साह्याने नागा लढाई करीत असत. एरवी त्यांचा व सरकारचा फारसा संबंध नव्हता. ठराविक महसूल घातलाच पाहिजे हा कायदा होता खरा; परंतु त्याच्या अंमलबजावणीबाबत सरकार जाणूनबुजून दुर्लक्ष करीत होते. त्या रानटी क्रूर लोकाना माणसात आणणे ही पहिली आवश्यक गोष्ट ठरवून सरकारने ते कार्य धर्मप्रसारकांवर (अर्थातच ख्रिस्ती) सोपविले होते.

## तीस वर्षांपूर्वी पेरलेले विष

सुमारे तीस वर्षांपूर्वी नागा लोकांच्या सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक विकासासाठी नागा नॅशनल कौन्सिलची स्थापना त्या वेळच्या कलेक्टरने केली. इंडियन नॅशनल कांग्रेसच्याच धर्तीवर सदर संघटना उभारण्यात आली. शासनाचा संपूर्ण आशीर्वाद लाभल्याने तिची प्रगती भराभर होऊ लागली. परंतु तो काळ ब्रिटनच्या भरभराटीचा, वैभवाचा, अनिर्बंध सत्तेचा असल्याने कोणतेही राजकीय उद्दिष्ट कौन्सिलसमोर नव्हते. नागाना ब्रिटिशांचे एकनिष्ठ नागरिक बनविणे हे कार्य मिशनरी संस्था व कार्यकर्ते चोखपणे पार पाडीत असल्याने तसे उद्दिष्ट मांडण्याची काही गरजही नव्हती. परंतु दुसऱ्या महायुद्धानंतर परिस्थिती एकदम पालटली.

लगतचा ब्रह्मदेश स्वतंत्र झाला. भारतातही स्वातंत्र्याची चळवळ फोफावत होतीच. आझाद हिंद सैनिकांचे शौर्य नागा लोकांपैकी अनेकाना पहावयास मिळाले होते, तर गावोगावी ती हकीकत मोठ्या आस्थेने ऐकली जात होती. इंग्रजी शिक्षणामुळे बाहेरच्या जगाचे वारे लागलेली मंडळी निर्माण होत होती. भातखाऊ बंगाली, मद्रासी, फाटके मराठे ब्रिटिशांशी टक्कर घेऊन त्यांच्या नाकी नऊ आणतात. आपण तर हिमालयाचेच सुपुत्र. स्वातंत्र्य रोमरोमात भिनलेले. मग आपण तरी कां म्हणून अंकीत रहावयाचे, असे विचार काही लोकांच्या मनात थैमान घालू लागले आणि १९४६-च्या सुमारास ब्रिटिश निघून जाणार हे नक्की झाल्याचे आढळताच त्या लोकांपुढे एकच प्रश्न उभा राहिला. तो म्हणजे आपले भवितव्य काय ?

नागा लोक आसामात विलीन होण्यास मुळीच राजी नव्हते. कारण मैदानातून डोंगरकपारीत आलेले भारतीय व्यापारी त्यांचे शोषण तर करीत होतेच. इतकेच काय, पण स्वतःला नागांपेक्षा श्रेष्ठ समजत होते. नागाना त्यांचेकडून तुच्छ स्वरुपाची वागणूक मिळत होती. ते आर्थिक शोषण किती भयानक होते ? याचे एकच उदाहरण असे सांगता येईल की भारत स्वतंत्र झाल्यानंतर दहा वर्षांनी सुद्धा १९५७ साली आसामातले व्यापारी नागांकडून विकत घेतलेली संत्री आसामच्या सखल प्रदेशात सव्वा रुपाया शेकडा या भावाने विकत होते. म्हणजे त्यांची खरेदी, वाहतूक खर्च, व्यापारी खर्च आणि नफा एवढे वसूल करूनही सव्वा रुपाया शेकडा संत्री विकणारे ते लोक ती संत्री काय भावाने खरेदी करीत असतील याचा विचार आपणच करणे इष्ट.

## फीझोचा राजकारणात प्रवेश

अशा त्या गढूळ, दूषित, शत्रुत्वाच्या वातावरणात १९५० चे आसपास ए. झेड. फीझो हे नांव प्रथम कानी पडू लागले. काम करण्याची व करून घेण्याची राक्षसी ताकद व आसामी लोकांविषयी पराकोटीच्या द्वेषाने भारलेला तो सुशिक्षित नेता नागाना लाभला, आणि खऱ्या अर्थाने नागा राजकारण खेळू लागले. फीझोने नागा नॅशनल कौन्सिलमध्ये वर्णी लावून घेतली. किंबहुना त्याची वर्णी न लागती तरच नवल. कारण सुशिक्षित नागांची संख्याच आधी मोजकी. त्यातही चलाख, बुद्धीवान व कूटनीतीचे बाळकडू नसानसात भिनलेली फिझोसारखी मोजकीच माणसे भारताला कायमची डोकेदुखी निर्माण करून ठेवतील अशी धोरणे (स्ट्रॅटेजी) ब्रिटिशानी आखली होती. फीझोने नागा नॅशनल कौन्सिलच्या आधारे प्रत्यक्षात राजकीय उलाढाली सुरू केल्या. त्यामुळे त्याला तीनदा कारावास भोगावा लागला. पण त्यामुळे त्याच्या भारतद्वेषाला अधिकच वळसे मिळाले. तिसरी शिक्षा भोगण्यापूर्वी व नंतरही त्याने संपूर्ण नागा प्रदेश पालथा घातला आणि सार्वभौम नागा राज्याच्या स्थापनेसाठी सर्व नागांची इतकी चांगली एकजूट बनवून सामर्थ्यसंपन्न अशी संघटना उभारली की आज नागालॅंड हे भारतातील एक घटक राज्य असूनही, त्या ठिकाणी अजूनसुद्धा रक्ताचे पाट पद्धतशीरपणे वाहवले जात आहेत. सुरक्षा दलांपैकी बराच मोठा हिस्सा तरी सदैव तेथेच गुंतवून ठेवावा लागत आहे. १९६७ चे







राजकीय "रहस्यकथा"




टी. टी. कृष्णाम्माचारी आणि पंतप्रधान इंदिरा गांधी यांची दिल्लीत भेट झाली.

"ऐंजाल-प्रकरण" तर सर्वांच्याच लक्षात असल्याने, नागांच्या बंडाळीचे उद्दिष्ट अधिक स्पष्ट ते काय करावयाचे ? पण हे असे कसे घडले वा घडते ?

## रक्तात मुरलेले काटेरी विष

सार्वभौम नागा राज्य प्रस्थापनेला अर्थातच भारत सरकारने विरोध केला. ती कल्पना धुडकावून लावण्याच्याच योग्यतेची असल्याने तिची वासलात तशीच लावण्यात आली. पण तसे करताना काटा मुळापासून उखडून फेकून देण्यात दिल्ली यशस्वी झाली नाही. काटा मोडला पण समूळ नष्ट न झाल्याने तो रक्तातच भिनला. त्यामुळे रक्त दूषित व विषारी बनले आणि ती जखम अजूनही चरत चालली आहे. सार्वभौम नागालँडची मागणी फेटाळताक्षणी फीझोने स्वतंत्र सेना उभारली. तिची उभारणी पूर्ण होताक्षणीच १९५५ मध्ये फीझोने स्वतंत्र सार्वभौम नागाभूमीची घोषणा केली.

फीझोने ती घोषणा केल्याबरोबर प्रथम आसाम रायफल्स या त्यावेळच्या आसामी सशस्त्र पोलिस दलाने ते सैन्य मोडून काढण्याचा प्रयत्न केला. त्यांना ते जमले नाही, तेव्हा भारतीय लष्कराने ती जबाबदारी स्वीकारली आणि ठिकठिकाणी नागा सैनिकांचा पराभव होत होत अखेर त्यांना भूमीगत व्हावे लागले. आजही बंडखोर नागा भूमीगत राहूनच लढाई देत आहेत. त्या पहिल्या उठावानंतर एक तप उलटूनही, राजकीयदृष्ट्या खुद्द नागालँड राज्याची स्थापना करूनही ती बंडाळी अजून चालूच आहे. निर्वाणीचा उपाय म्हणून बंडखोरांच्या टापूतील खेडीच्या खेडी दुसरीकडे वसविण्यात आली असली तरी अजूनही पालथ्या घड्यावर पाणी अशीच परिस्थिती कायम आहे. कां ?

फीझोने उभारलेली सेना नागांचीच असल्याने त्या सैनिकांना अन्न-वस्त्र-निवारा देणे, हे प्रत्येक नागा—भले तो बंडखोर असो वा नसो — आपले कर्तव्य मानतो. आणि अगदी अलिकडच्या काही वर्षात बंडखोरांनी तर "बाप दाखव नाही तर श्राद्ध कर" ही भूमिका पत्करून दडपणाचा वरवंटा इतका जबरदस्त फिरविला आहे, की त्यांना मदत करण्यावांचून गत्यंतरच उरलेले नाही. तशातच चिनी पाकिस्तान्यांची साथ लाभल्याने बंडखोर अक्षरशः उतले मातले आहेत.

**बंडखोरांनी शस्त्रे खाली ठेवल्यास त्यांना अभय देण्यात येईल ही घोषणा आतापर्यंत जेव्हा जेव्हा करण्यात आली तेंव्हा तेव्हा ती निव्वळ घोषणाच ठरली. कारण त्यात एक बारकावा होता. तो असा की फक्त आसाम आणि आता नागालँड सरकारविरुद्ध (प्रांतिक स्वरूपाचे कायदे) शस्त्र उचलणाऱ्या बंडखोरांनाच माफी मिळू शकत होती वा मिळते. परंतु वैयक्तिकरीत्या व्यक्तीविरुद्ध हल्ला करणाऱ्यांना क्षमा केली जात नसे, आजही जात नाही. त्यामुळे अनेक बंडखोर नागांना शरणागती स्वीकारणे पटतच नाही. कारण त्या बंडखोरांनी शेकडो निरपराध लोकांचेही मुडदे पाडलेले आहेत.** आणि बंडखोरांचा तर असा ठाम विश्वास आहे की ते अजून कित्येक वर्षे अशा गनिमी काव्याने लढा देऊ शकतील. त्याचे कारण लष्करीदृष्ट्या पहावयाचे तर असे सांगता येईल की मुळातच हा लष्करी लढा आहे असा जो भ्रम रूढ झाला आहे, तो डोक्यातून साफ काढून टाकला पाहिजे. नागालँडचा लढा लष्करी नसून राजकीय, सामाजिक व आर्थिक स्वरूपाचा आहे, हे येथे ठामपणे नमूद करणे जरूर आहे. नागा बंडखोर नेत्यांशी अनेकवार बोलणी झाली. पण ती सगळी फिस्कटली याचेही तेच एकमेव प्रमुख कारण आहे.

## राजकीय परिस्थितीचे पृथःकरण

नागालँडची राजकीय परिस्थिती पहाता असे आढळून येते की नागा नॅशनल कौन्सिलची स्थापना होईपर्यंत तेथे उघड उघड राजकीय स्वरूपाची कोणतीच हालचाल नव्हती. मिशनऱ्यांनी भगीरथ प्रयत्नाने शिकवून तयार केलेली पहिली 'इंग्रजी' पिढी त्या सुमारास तिशी-चाळीशीत आलेली होती. योगायोगाने त्याच काळात जगात अनंत राजकीय उलाढाली होत होत्या. ते कौन्सिल स्थापन झाल्यानंतर १९६१ पर्यंत नागांचा पाकिस्तान्यांशी संबंध प्रस्थापित झालेला नव्हता. त्यामुळे तेथील मिशनऱ्यांविरुद्ध कारवाई करण्याची गरज तसेच नागा समाजाला आपल्यात ओढण्याची आवश्यकता भारत सरकारला वाटतच नव्हती असे म्हणणे वस्तुस्थितीनिदर्शकच ठरेल. परंतु ५५ सालापर्यंत नागा नॅशनल कौन्सिल व फीझो यांच्या कारवायांचे स्वरुप पूर्णपणे उमगल्यानंतर तेथील सर्व मिशनऱ्यांची हकालपट्टी करणे भारत सरकारला भाग पडले. प्रत्येक गोष्ट केंद्रालाच करावी लागणार हे कटु सत्यही त्याच वेळी केंद्राला उमगले. कारण आत्यंतिक चीड व विद्वेषामुळे आसाम



अनुक्रमणिका

सरकारला मानावयालाच नागा लोक तयार नव्हते, आजही नाहीत. 'खबरे' म्हणून काम करण्यास नागा कधीच तयार नव्हते.

सामाजिक दृष्ट्या पाहिले तर असे आढळते की तेथे स्थायिक झालेल्या भारतीयाना त्या बंडाळीचे सोयरसुतक नाही. ज्या नागाना 'भारतनिष्ठ' असे मानले जाते, तेही आपल्याला कोणत्याही तऱ्हेने 'बातमी' पोहोचविण्यास फारसे उत्सुक नसतात. तेथे दरीखोरी व डोंगर इतके आहेत की रोज एका नवीन टेकडीत लपून रहावयाचे म्हटले तरी सहज शक्य होते. ना रेल्वे, ना रस्ते, ना पूल ! जी रेल्वे आहे, तिच्या सुरक्षिततेच्या चिंधड्या चिंधड्या उडतात हे वारंवार प्रसिद्ध होणाऱ्या बातम्यांवरून स्पष्टच होते. मग लष्करी हालचालीनी काय साधणार ? बंडखोर आणि इतर नागांची व आपल्या जवानांची हत्या ! तेथील प्रतिकूल हवामानामुळे आकाश फुटल्यागत कोसळणाऱ्या पावसाने, जळवांमुळे, हाडीज्वर, पीतज्वर इत्यादि रोगांमुळे तेथे नोकरी करणे फार कष्टाचे मानले जाते. बरे समजा अत्यंत न्यायनिष्ठुरतेने प्रचंड स्वरुपात हल्ला करून तो टापू तोफा-बंदुका बॉम्बनी भाजून बेचिराख करावा असे ठरविले, तर जागतिक प्रतिक्रिया काय होईल ? हाही विचार करणे क्रमप्राप्तच ठरते. कारणे उघड आहेत. त्यातच पाक व चिनी हस्तकांचा त्याना पुरेपूर पाठिंबा आहे, हेही लक्षात टेवावे लागते.

आर्थिक दृष्ट्याही नागालँड अविकसितच आहे. फक्त शेती व घरी असलेल्या मागावर वस्त्रे विणणे हेच दोन प्रमुख व्यवसाय आहेत. कारखाने जवळ जवळ नाहीतच.

सारांश, ही समस्या दोन पाच वर्षात सुटण्यासारखी नाही. त्यात आणखीही एक बारकावा फार महत्त्वाचा आहे. अंगामी, सेमा, आओ व कोन्याक या टोळ्यांचे परस्पर हाडवैर फारसे ओसरलेले नाही.

## शैक्षणिक प्रगती-सामाजिक एकात्मता

नागा समस्या पूर्णपणे आटोक्यात येऊन त्यानाही भारतीयत्वाचा साक्षात्कार घडवावयाचा असल्यास कित्येक वर्षे प्रयत्न करावे लागतील.

पहिली गोष्ट म्हणजे गोरखा, भुतानी, तिबेटी अशा नागांशी मिळत्याजुळत्या वंशांची वस्ती त्या राज्यामध्ये करण्यात यावी. त्यामुळे शेतकी व संरक्षण हे दोन्ही उद्देश साध्य होतील. तसेच त्याना नागा एकदम बुजणार नाहीत. त्या वसाहती जसजशा विकसित होतील तशतशा अडचणी दूर होतील. दुसरी बाब म्हणजे खुद्द आसामी व नागांमधील वितुष्ट नष्ट झाले पाहिजे. तिसरे असे की औद्योगिक प्रकल्पांची उभारणी करताना नागा लोकांची नीट समजूत काढून त्याना त्याचे महत्त्व पटवून देऊन मगच ते सुरू व्हावेत. व्यापारी व सावकार यानीही नागांची लुबाडणूक थांबविलीच पाहिजे.

सर्वात शेवटची व महत्त्वाची गोष्ट अशी की नागालँडमधे माध्यमिक शिक्षण पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांना भारतामधील इतर विद्यापीठानी आदराने बोलावून नेऊन त्याना भारतीय जीवनात समरस करून टाकले पाहिजे. त्याना नंतर भारतातही उद्योग मिळाला पाहिजे. ते नागा विद्यार्थी पाच सहा वर्षे येथे राहून अनुभवाने बरेच काही शिकतील. त्यातूनच उद्याचा प्रगल्भ व भारतीय वैशिष्टयानी परिपूर्ण नागा प्रदेश निर्माण होईल.

●●●

एक जीवन-रहस्यकथा

नशिबाचं असंच असतं....चांगल्या गोष्टी नको म्हटल्यानं टळतही नाहीत नि टाळताही येत नाहीत....म्हणून आपल्या वाट्याला येईल ते यथेच्छ उपभोगावं नि निर्धास्त राहावं....

# पट

-रवींद्र पिंगे

**राजवाडे** आणि मी एम. ए. च्या वर्गात एकत्र आलो होतो. वकिलीची परीक्षा उरकल्यानंतर एका इंग्लीश कंपनीत तो नोकरी करीत होता. नोकरीची पहिली तीन चार वर्षं शिक्षणाच्या दृष्टीने त्याने तशीच भाकड काढली. नंतर निव्वळ जिद्दीने तो आमच्या बरोबर एम. ए. चा अभ्यास करू लागला. एम. ए. झाल्यानंतर शे-सव्वाशे रुपयांच्या नोकऱ्याना चिकटायची स्वप्नं आम्ही पाहात होतो, तेव्हा राजवाडे महाशय एल. एल. एम. चाही अभ्यास करायच्या गोष्टी करायचा. अभ्यासाचा जणु काही त्याने ध्यासच घेतला होता. तेव्हा सुरवातीला मला वाटलं की ह्या स्कॉलर माणसावरोबर काही आपलं जमायचं नाही. आणि समजा पटलंच, तर ते जेवढ्यास तेवढंच राहील. आमच्यात गाढ मैत्रीचे धागे विणले जातील हे मला असंभवनीय वाटलं. पहाटेस कोंबड्यासारखा उठून राजवाडे म्हणे दंडवैठका मारायचा ! पुस्तकात सांगितल्याप्रमाणे दूध पिऊन अभ्यास करायचा. नंतर इमानेइतबारे नोकरी. आणि संध्याकाळी आमच्या बरोबर एम. ए. चा वर्ग. अशा धोपटमार्गी पुस्तकी माणसा-बरोबर माझे ग्रह कसे जमावेत ?

हो, आता मी माझी ओळख करून देतो. नांव : गंगोळी. मी भावगीत गायक आणि शिक्षक आहे. चांगली नोकरी मिळत नव्हती. म्हणून फावल्या वेळात एम. ए. चा खुळखुळा वाजवीत होतो. नोकरी मिळती तर तो खुळखुळा दूर भिरकावला असता. पण तसा योग नव्हता.

कमळासारख्या टपोऱ्या डोळ्यांची अमलाडी आमच्याच वर्गात होती. खानदानीचं वारं जिच्या अवघ्या व्यक्तिमत्त्वाभोवती झुळझुळत आहे अशी एक मूटभर चांदणं उधळणारी लावण्यवती,

ह्यापरतं तिचं वेगळं वर्णन करता येणं कठिण आहे. सुंदर मुलगी आणि तशात एम. ए. चा अभ्यास करणारी, म्हणजे वर्ग सुरू होऊन चांगला स्थिरस्थावर झाल्यानंतर तिने मुरडत मुरडत यायचं, मैत्रिणीं-कडे पाहून लाडेलाडे हसायचं आणि वाळू पकडून बसलेल्या खेकडयां-सारखे मागची बाकं पकडून बसलेल्या आशाळभूत पोराना तिरप्या कटाक्षांच्या फैरी टाकून घायाळ करायचं, हे नेहमीचंच कोष्टक होतं. ते कोष्टक खोडून अमलाडी वर्गात सर्वात प्रथम येऊन बसायची. आणि तेही पुस्तकात डोकं खुपसून. वर्ग सुटला की इकडे तिकडे रेंगाळण्यात वेळ न घालवता ती तडक बाहेर पडून आपली मोटार पकडायची. त्यामुळे, एक सरळमार्गी सोज्वळ आणि सुंदर मुलगी ह्याच्या पलीकडे मला तिची काहीही माहिती नव्हती. तिने सहलीत वगैरे भाग घेतलेला आठवत नाही. निदान आमच्या वेळी तरी 'मराठी वाङ्मय मंडळ' म्हणजे लेखक होण्याची स्वप्न पाहणाऱ्या फालतु मुलानी सुंदर मुलींच्या पुढे गोंडा घोळ घोळ घोळण्याची आणि अखेर दोन चार कविता कशाबशा लिहून नंतर शास्त्रशुद्ध नांगी टाकण्याची एक मोक्याची जागा असायची. अमलाडी तिथेही फिरकली नाही. मंडळाच्या एखाद्या कार्यक्रमाला आलीच तर टाळ्या वगैरे वाजवायच्या भानगडीत न पडता, कार्यक्रमानंतर ती निमूटपणे पाय न वाजवता निघून जायची. अशा त्या चांदण्यातल्या डोहासारख्या शांत आणि पहाटेच्या चांदण्यात तरंगणाऱ्या मेघा-सारख्या, जगापासून एकाच वेळी अलिप्त आणि निकट असणाऱ्या त्या मुलीबरोबर माझ्यासारख्या भगभगलेल्या भावगीत गायकाचे काय संबंध येणार ? केवळ, ती आमच्या वर्गात होती इतकंच काय ते आम्ही इतराना इमानेइतबारे सांगायचं ! तात्पर्य, मी तिच्या खिसगणतीतहि नव्हतो आणि ती माझ्या खिसगणतीत असायचं कारणही नव्हतं.

राजवाडेची आणि माझी मैत्री मात्र ह्या ना त्या निमित्तान वाढत चालली होती. कधी तो मला चहा पाजे; कधी मी त्याला पानपट्टी देई. तास संपल्यावर आम्ही घरी एकत्रच परतू लागलो. कधी कधी कोटातून रात्रीच्या वेळी गुलमोहोराच्या फुलापानांचा सुगंधी पीत पीत आम्ही पायीच रमतगमत परतायचे. काळोख पडला की चिडीचूप व्हायचं. सर्वत्र सामसूम असायची. मैदानातल्या क्रॉसपुढे पेटवलेल्या मेणबत्त्या, सागरपाण्यात चंद्राचं प्रतिबिंब पाझरताना दिसावं, त्याप्रमाणे चांदण्याच्या फेसात तेवत असलेल्या दिसायच्या. चांदण्यांचं अस्तित्व जाणवायचं असा तो नामी काळ होता. अशा त्या मोहरलेल्या चांदण्यातून परतत असताना राजवाडे एक दिवस मला म्हणाला,

"गंगोळी, तुझ्याकडे माझं थोडं काम आहे."

"कसलं ?" मी विचारलं.

"तुझ्याबरोबर मला थोडं खाजगी बोलायचंय."

"मग बोल की."

"आपण ह्या मैदानात पाच मिनिटं बसूया. तिथे बोलू."

"ठीक आहे. तू अगदी मोकळ्या मनानं बोल. आडपडदा ठवण्याचं कारण नाही." मी म्हटलं.

आम्ही मैदानाकडे वळलो. चांदणं पिऊन तृप्त झालेलं गवत थंड झालं होतं. त्या गार गालीच्यावर आम्ही बसलो. आजुबाजूला कुणीही कानोसा घेत नाही हे नीट निरखून पाहिल्यावर राजवाडेने सुरुवात केली,

"सगळं अगदी स्पष्ट स्पष्ट सांगू नं ?"

मी म्हटलं "सांग. मी ते ह्या कानाचं त्या कानाला करणार नाही."

"मी लग्न करायचा विचार करतोय. तुला काय वाटतं ? करावं की नाही ? आता माझं वयही झालंय. मी जरी तुझ्याबरोबर वर्गात असलो, तरी वयाने मी चार पाच वर्षांनी मोठा आहे."

मला फार आनंद वाटला. एका चांगल्या कर्त्यासवरत्या तरुणाचं भलं होणार आहे ह्या विचाराने कोणाला समाधान वाटणार नाही? मी म्हटलं,

"राजवाडे, तू फार नामी गोष्ट बोललास बघ. तुझं लग्नाचं वयही झालं आहे. तुला इंग्लिश फर्ममध्ये चांगली नोकरी आहे. वकिलीची पदवी तर तू मिळवली आहेसच नि वर आता एम. ए. ही होशील. आणखी काय हवं ? माझी शंभर हिश्श्यानी खात्री आहे की तुला उत्तम गृहिणी पत्नी म्हणून मिळेल. तू लग्नाला उभा आहेस हे लोकाना फक्त कळायचाच अवकाश, की एकापेक्षा एक चांगल्या मुली तुझ्या दारात सांगून येतील. आय वुइश यू प्लेन्टी ऑफ लक्. गो अहेड !"

"माझ्या मनात अमलाडीबरोबर लग्न करायचं आहे."

"कोण अमलाडी ?"

"आपल्या वर्गातली."

"पण तुझं तिच्याशी तसं काही बोलणं झालंय ?"

'नाही. पण माझ्या ती फार मनात भरल्याय. कशी शांत, सोज्वळ दिसते ! त्या क्रॉससमोर मेणबत्त्यांचा प्रकाश फुललाय ना, अगदी तशी वाटते मला ती. शांत आणि स्थिर."

"अरे यार, तू तर अगदी काव्यात बोलायला लागलायस ! प्रेमबीम करत नाहीस ना तिच्यावर ?"

"तेच तुला सांगणार होतो. माझं अमलाडीवर कमालीचं मन जडलंय. कधी कधी वाटतं, हे गेल्या जन्मीचेच ऋणानुबंध असावेत. एरव्ही इतकी ओढ वाटेलच कशी ? पण ते कसंही असो; मला तिच्याशी लग्न करावसं वाटतं हे सत्य आहे."

"मग आता गाडं अडलंय कुठे ?"

"तिच्याकडे हा विषय कसा काढावा तेच मला कळत नाही. माझी तिच्याशी ओळखही नाही. बरं, ओळख करून घ्यावी म्हणावं तर ती वर्ग सुटल्यानंतर दोन मिनिटंही थांबत नाही. म्हणून मला तुझा सल्ला हवाय ह्या प्रकरणात."

ही असली प्रेमं आणि त्यांचे पुढे निघणारे धिंडवडे आम्हा भावगीत गायकाना पै-पातरीने माहिती असतात. तेव्हा सन्मित्राला सावधगिरीचा इशारा देताना मी सांगितलं,







"काही कल्पना नाही बुवा !" मी म्हटलं.

हे खोटं होतं. रेळेची मला माहिती नाही असं राजवाडेला मी सांगितलं याचं कारण तो विषय त्याच्या दुखरू मनाजवळ वाढवीत बसावं असं मला वाटेना. खरं सांगायचं तर त्या लकी रेळेला मी चांगलाच ओळखीत होतो. त्याचं नांव सुधीर रेळे. बी. ए. होईपर्यंत आम्ही एकाच कॉलेजात होतो. नंतर त्याला नोकरी मिळाली आणि त्याने अभ्यासाला टाळं ठोकलं. दिसायला तो फार देखणा आणि उंच होता. काकडवाडीत त्याचा त्या काळातहि ब्लॉक होता ह्यावरून त्याच्या सुबत्तेची कल्पना येईल. त्याला आगापिछा असा काहीच नव्हता. कॉलेजमध्येही तो नांवापुरताच असायचा. अधीमधी दिसायचा आणि दिसतो नाही तोच अदृश्य व्हायचा. माझे आणि त्याचे मैत्रीचे धागे कधीच जुळले नाहीत. मात्र जेव्हा आमची अधूनमधून गाठ पडायची, त्यावेळी आम्ही मनमोकळेपणाने गप्पा मारायचे. त्याच्यात वैशिष्टय एवढंच होतं की तो सिगारेटी ऐवजी चिरूट ओढायचा. अमलाडीचं आणि त्याचं प्रेमप्रकरण असणं शक्यच नव्हतं. तिला मी त्याच्याशी प्रेमालाच तर सोडाच, पण साधं संभाषणही करताना कधी पाहिलेलं नव्हतं. रेळे मात्र त्याच्या घरमालकाच्या प्रमिला नांवाच्या मुलीच्या प्रेमात चांगला गळ्यापर्यंत रुतलेला होता हे मला मुद्देमालासकट माहिती होतं.

एकदा मी मलबार हिलवर फिरायला गेलो होतो. वरच्या बागेत वृक्ष फुलले होते. हिरवळ प्रसन्नता फाकीत होती. निरभ्र आभाळातून प्रकाश पाझरत होता. खुशाल मनाने मी ताटव्यां-मधल्या वाटीकांमधून हिंडत होतो. हिंडता हिंडता अशाच एका ताटव्यामधल्या झुडपाच्या आड एक जोडपं बसलेलं दिसलं. अर्थातच असलं दृश्य मला काही नवं नव्हतं. पण औत्सुक्याने विवेकावर मात केली आणि माझी वाट वाकडी करून मी त्या युगुलाच्या जवळ गेलो. त्यांचे चेहेरेमोहोरे पाहिले तेव्हा मला आश्चर्याचा धक्का बसायचा होता, कारण तो तरुण म्हणजे सुधीर रेळेच होता. त्याच्या-सारखीच गोऱ्या रंगाची आणि घाऱ्या डोळ्यांची तरुणी त्याच्या कुशीत बसल्या बसल्या विसावली होती. तिचं भान हरपलं होतं. तो सावध होता.

ते दृश्य पाहून मी जरासा संकोचलो. मात्र रेळे संकोचला नाही. हात झाडीत तो पुढे आला नि मला म्हणाला,

"आज तू इकडे कुठे ?"

"आलो सहज झालं." मी सांगितलं.

"आनंद आहे. पण तूसुद्धा असा दुकट्याने आलास की मला अधिक आनंद होईल. थांब मी तुझी माझ्या मैत्रिणीशी ओळख करून देतो." हे ऐकून ती तरुणी लाजत लाजत उभी राहिली.

"ह्या प्रमिला दातार. आमच्या घरमालकांचीच ही मुलगी."

नमस्कारांची देवाणघेवाण झाली. चार कुशल प्रश्न झाल्यावर त्या चार हसऱ्या डोळ्यांचा मी गांगरलेल्या मनाने निरोप घेतला.

"असं पहा राजवाडे, अमलाडीशी लग्न केल्यानंतर तुला सुख लाभेल असं तुला अगदी अंत:करणापासून वाटतं काय ?"

"प्रश्नच नाही. तिचा चेहेराच सांगतो की ती मला अगदी परमावधीचं सुख देईल."

"म्हणजे पंचवीस टक्के जमलं ! बरं, समजा तुमचं दोघांचं लग्न झालंच तर तू तिला जन्मभर सुख आणि संरक्षण देऊ शकशील अशी खात्री आहे का तुझी ?" मी विचारलं.

"अरे काय प्रश्न विचारतोस तू ? मला इतकी चांगली नोकरी आहे. प्रॉस्पेक्टस् तर उत्तमच आहेत. चांगलं शिक्षण आहे. आणि शिवाय मी नाकासमोर चालणारा माणूस आहे. एकदा का मी ज्याला आपलं म्हटलं, त्याच्याशी मी कधी बेईमान होणार नाही. सामर्थ्य आणि स्वास्थ्य दोन्हीही माझ्याजवळ आहेत. तेव्हा तिला मी जन्मभर सुख आणि संरक्षण देऊ शकेन, ही अगदी दगडावरची रेघच समज तू."

"म्हणजे आणखी पंचवीस टक्के जमलं ! बरं, तिच्याकडच्या मंडळींना तू आवडशील का ?"

"माझी खात्री आहे. मी निर्व्यसनी आहे. चांगला शिकलासवरलेला आहे. मिळवता आहे नि मुख्य म्हणजे आईबापांचा एकुलता एक मुलगा आहे ! मुलीच्या बापाला आणखी काय हवं असतं ?"

"चला; आणखी पंचवीस टक्के जमलं ! म्हणजे एकूण पंच्याहत्तर टक्के मामला जमला ! आता शेवटचा प्रश्न. तुझ्या घरच्या मंडळींना अमलाडी आवडेल काय ?"

"एक तर माझ्याकडची माणसं म्हणजे कोण ? तर आई नि वडील. मला दुसरं कुणीच नाही. आई–वडील ग्वाल्हेरलाच असतात. तेव्हा त्यांचा फारसा संबंध मुदलात येणारच नाही. शिवाय मी जे करेन, त्याच्याविरुद्ध ते स्वप्नातसुद्धा जाणार नाहीत. आणि वर माझ्या बायकोला देवापुढल्या निरंजनासारखं जपतील."

"हो नं ? मग गणित शंभर टक्के जुळलं. हे स्थळ तू आता अगदी पक्कं करून टाकायच्या मार्गाला लाग."



"ते खरं रे. पण तुझा सल्ला हवाय की आता पुढे कसं जायचं ?" राजवाडेने काकुळतीने विचारलं.

ह्या क्षेत्रातला माझा नि माझ्या मित्रांचा सगळा अनुभव जमेस धरून मी सांगितलं,

"राजवाडे, मित्र म्हणून सांगतो तुला की आम्हा भावगीतवाल्यांच्या आयुष्यात हे असले प्रसंग पावलागणिक येतात. अनुभव असा आहे की लग्नाचा प्रश्न मुलींकडे सरळ सरळ काढला तर त्या बिचकतात आणि विचार न करताच नकार देऊन मोकळ्या होतात. परिणामी आपली उमेद मरते. होकार दिलाच, तर तो विचार न करता दिलेला असतो ! त्यात फारसं मन नसतं. अंती, लग्न होऊनही मजा निघून जाते नि इतरांना फुकटात नाटक बघायला मिळतं. तेव्हा उत्तम मार्ग म्हणजे तू सरळ तिच्या बापाचीच गाठ घे नि तुझा मनोदय नि:शंक मनाने त्यांच्याशी बोलून दाखव. लेकीपेक्षा त्याने पंचवीस तरी पावसाळे जास्ती बघितलेले आहेत. तेव्हा तो माणूस सर्व बाजूनी सर्व परिस्थितीचा पूर्ण विचार करील. जावई म्हणून तुझ्याकडे सर्व गुण आहेत. त्यालाही असा कुणीतरी जावई हवाच असणार. किंबहुना, तशा कुणाच्या तरी तो शोधातच असेल नि तुझी मागणी ऐकल्यावर त्याला लॉटरी फुटल्याचा आनंद होईल. टेक इट फ्रॉम मी. तुझं काम फत्ते होणार !"

बरेच आढेवेढे घेतल्यानंतर मी दाखवलेला मार्गच जवळचा आणि निर्धोक आहे हे राजवाडेला पटलं. त्याच्या पुढच्याच रविवारी त्याने अमलाडीच्या वडीलांची भेट घेतली. त्यानंतरचा कथाभाग राजवाडेने मला सांगितला. राजवाडेने देवाच्या पाया पडून मुलीच्या वडीलांची भेट घेतली आणि त्यांना आपला मनोदय सांगितला. ती शुभकामना ऐकून तिच्या वडीलांना फारच आनंद झाला. राजवाडेची इतर माहिती जाणून घेतल्यावर तर ते म्हणाले, "हा नातेसंबंध जुळून आला तर तो मी परमेश्वराचा माझ्यावरला अनुग्रहच मानीन !" आणि ह्या स्थळाबाबत मुलीचे मन जाणून घेण्यासाठी त्यांनी राजवाडेकडे आठ दिवसांचा वेळ मागितला. राजवाडेने तो मोठ्या उमेदीने दिला. त्याच्या पुढच्या रविवारी राजवाडेच्या बिऱ्हाडी ते स्वत:च आले आणि नाईलाज होऊन म्हणाले,

"हा नातेसंबंध जुळून यावा अशी देवाच्या मनात इच्छा नाहीसं दिसतं. मी मुलीला खूप समजावून सांगितलं. पण ती म्हणते की रेळे नांवाच्या कॉलेजमधल्या कुणा तरुणावर तिचं मन जडलंय्. तिला रेळेंबरोबर लग्न करायचंय. अखेर मुलीचंहि मत हिशोबात घेतलंच पाहिजे. म्हणून आता मी त्या रेळेंना मागणी घालायला जाणार. दरम्यानच्या काळात, मी तुम्हाला तुमच्या आयुष्यात यश लाभो अशी इच्छा व्यक्त करतो."

व्यथित मनाने ही हकीगत सांगून झाल्यावर राजवाडे मला म्हणाला,

"कळलं ? आमचं नशिब हे अस्सं बेकार आहे. आम्ही सरळ चालायचं ठरवलं तर आमच्या पायाखालचा रस्ताच वाकडा होईल नि आम्ही धडपडू ! पण काय रे, हा लकी रेळे कोण ?"

तर, असा तो सुधीर रेळे !

अमलाडीने स्वयंवर जिंकलं. यथावकाश ती सौ. रोमा रेळे झाली. हे जोडपं रस्त्यात एकान्त शोधीत एकमेकाला खेटून हिंडताफिरताना आम्हाला दिसू लागलं. नेहेमी मान मुडपून चालणारी अमलाडी आता सूर्यफूलाच्या रोपाप्रमाणे मान ताठ ठेवू लागली. नवऱ्या-बरोबर डुलत डुलत चालू लागली. मला आपलं बरं वाटलं. म्हटलं अमलाडी तर अमलाडी, पण निदान ती तरी सुखी झाली.

एकदा माझी त्या जोडप्याशी रस्त्यात अचानक गाठ पडली तेव्हा रेळेने तिला थांबवून सांगितलं,

"अग, हा बघ माझा मित्र गंगोळी. आम्ही बी. ए. पर्यंत एकत्र टिकलो. हा लेकाचा भावगीतं फार चांगली म्हणतो. निदान त्यावेळी म्हणायचा तरी ! नंतर माझ्याकडे वळून तो म्हणाला, "बरं का गंगोळी, ह्या आमच्या सौ. रोमा. तुझ्याच वर्गात होत्या, असणार." ह्यावेर आश्चर्याचा भाव व्यक्त करून मी तिच्या खिसगणतीतसुद्धा नव्हतो ह्याचं मला रोकडं प्रत्यंतर आणून दिलं. "आता एकदा ह्या सुगरणीचं गृहकौशल्य बघायला सवड काढ की रे. माझं काकडवाडी-तलं घर तुला ठाऊकच आहे." रेळे म्हणाला. सौ. रेळेंचं त्यात मन नव्हतं.

सवडीनुसार कधीतरी त्यांच्या पाहुणचाराला जायचं मी खोटंच कबूल केलं. अशी अळंटळं करीत पुढे केलेली आमंत्रणं मी स्वीकारीत नाही. कारण निव्वळ कपभर चहा आणि वशीभर पोह्यांच्या बद-ल्यात अशी माणसं आमच्याकडून चांगल्या अर्धा डझन भावगीतांचं दळण दळून घेतात आणि वर आपल्या रसिकतेचा टेंभा आमच्या-समोरच मिरवतात, हा अनुभव माझ्या कनवटीला भरपूर प्रमाणात आहे. ते एक रीत म्हणून माझ्या गळ्यात बांधलेलं निमंत्रण मी अगत्यपूर्वक मनाबाहेर टाकलं. रेळे आणि रोमा रस्त्यात हिंडताना दिसत. त्यांना भेटणं मात्र मी टाळू लागलो.

असे तीन चार महिने गेले.

त्यानंतरची एक संध्याकाळ. मी महालक्ष्मीच्या दर्यावर फिरायला गेलो होतो. समुद्राला जोरदार उधाण आलं होतं. सागरलाटा आपल्या सहस्र फणांचा फुत्कार खडकांवर आदळीत होत्या. मग सगळीकडे पांढराशुभ्र फेसच फेस होई. चैतन्याने मोहरलेल्या फेसाची ती पाणफुलं अंगाखांद्यावर घ्यावीत म्हणून मी त्या खडकांवरून फिरत होतो. माझं लक्ष माणसांकडे नव्हतं. सागराकडे होतं. उसळलेल्या लाटा फुटल्या की फिरायला आलेली माणसं किंचाळून मागे सरायची. एकेक लाट शेकडो माणसांना पाठच्या पाठी पळवून लावायची. फक्त एक जोडपं मात्र त्या रुद्र सागराच्या माऱ्यापासून पळत नव्हतं. आपल्यातच गुंगून ते बसलं होतं. म्हणून माझं त्यांच्याकडे विशेष लक्ष गेलं.

— ते जोडपं म्हणजे पुन्हा आमचा सुधीर रेळे आणि पुन्हा त्याची तीच प्रमिला दातार ! रेळेला ती अगदी खेटून बसली होती. रेळेचा रक्षणकर्ता हात तिच्या देहाभोवती लपेटलेला होता. म्हणजे रस्त्यात त्याचा जो हात धरून रोमा ताठमानेने डुलत जायची तोच त्याचा हात आज प्रमिला दातारला ऊबसौख्य पुरवीत होता.

ते दृष्य पाहून मला फार खिन्न वाटलं. रेळेचं लग्न होऊन पुरते चार-सहा महिने झाले नाहीत, तोच त्याने पुन्हा प्रमिलेबरोबर फिरावं ? आणि तेही अशा एकोशा जागी ? रोमाला हे माहीत होतं ? तिची ह्या प्रकरणाला अनुमती होती ? रोमाच्या प्रेमाचा अर्थ काय ? तिच्या स्वयंवराचे फलित काय ? प्रयत्न करूनही हा गुंता मला सोडवता येईना. जसजसा विचार करावा तसतसा मी त्या गुंत्यात गुरफटत गेलो.

आश्चर्याची गोष्ट म्हणजे रेळे-प्रमिला दातार हे जोडपं त्यानंतर मला अफगाण चर्चच्या हिरवळीवर बसलेलं दिसलं; एकदा माही-मच्या किल्ल्याजवळ दिसलं; तर एकदा विरारला जाणाऱ्या फास्ट गाडीच्या पहिल्या वर्गाच्या डब्यात एकटंच बसलेलं दिसलं. हा काय प्रकार आहे मला कळेना. पण नंतर नंतर ती दोघं वारंवार दिसू लागली तेव्हा साहजिकच ती गोष्ट नेहेमीचीच झाली. त्यांचा विचार करायचं माझ्या मनाने सोडून दिलं.

पुढे असेच आणखी दोन महिने गेले. मग एका संध्याकाळी मला रेळे आणि रोमा डुलत डुलत समोरून येताना भेटले, तेव्हाच मला आश्चर्य वाटलं ! रोमाला दिवस गेले होते. त्यामुळे तिच्या मूळच्या सोज्वळ चर्येवर मूठभर चांदण सांडलेलं दिसत होतं. तिनेच मला हटकलं,

"काय हो गंगोळी महाशय ? येणार–येणार म्हणून सांगितलंत आणि चांगलाच गुंगारा दिलात की हो ! बरं, झालं-गेलं गंगेला मिळालं. आता केव्हा येता बोला आमच्या घरी ? ह्या रविवारी येता ? रात्रीचे जेवायलाच या. मला तुमचं गाणं फार फार ऐकायचंय."

मी टाळाटाळ केली, तेव्हा रेळेचा हात आपल्या हाताने कुरवाळीत ती साखर पेरीत म्हणाली,

'असं पहा, आमच्या लग्नाला आता सात महिने व्हायला आले. आता आणखी एखादाच महिना आम्ही पाहुण्यांचा आदरसत्कार करू शकू. नंतर तुम्ही स्वतः होऊन जरी आलात नं, तरी तुमची उठबस करणं आम्हाला शक्य होईलसं वाटत नाही. तेव्हा, आम्ही प्रेमाने बोलावतोय् तोपर्यंत तुम्ही येऊन घ्या. ह्या रविवारी आम्ही तुमची वाट बघतो आहोत."

"अग, त्याच्या ते लक्षात आलं नसेल असं तुला वाटतं काय ?" तो विजयी स्वरात म्हणाला.

मी रविवारच्या रात्रीच्या जेवणाचं आमंत्रण स्वीकारलं. खरं म्हणजे ह्या संधीची मी वाटच पाहात होतो. त्यांचे सांसारिक संबंध कसे आहेत ते मला अगदी जवळून निरखायचं होतं. दोन वर्तुळांच्या कक्षा कुठे मिळतात नि कुठे त्यांना छेद जातो, ते पहायचं होतं.

रविवारची संध्याकाळ. मी मोठ्या औत्सुक्याने रेळेच्या काकड-वाडीतल्या घरी गेलो. रोमाचा तो टापटीपीचा संसार पाहून माझी तहानभूक हरपून गेली. प्रत्येक गोष्ट तिथे जागच्या जागी होती आणि वस्तूंच्या मांडणीवरून कुशल कलावतीचा हात सुबकपणे

फिरलेला दिसत होता. सौ. रोमा रेळे झाल्यावर सुद्धा तिने आपलं अमलाडीपण नीट जपलं आहे असं मला वाटलं.

"कसा काय वाटला आमचा संसार तुम्हाला ?" तिने विचारलं.

"पाहून मी तृप्त झालोय." मी सांगितलं. तेव्हा तिला झालेलं समाधान तिच्या मुग्ध चेहेऱ्यावर स्थिर झालं. आमचं बोलणं चाललं होतं. रेळे शांतपणे वर्तमानपत्र वाचीत बसला होता. तो मध्येच उठला आणि आठवल्यासारखं करून म्हणाला,

"जरा पाच मिनिटं मी रजा घेतो तुमची. माझे चिरूट संपल्यायत. ते आणतो. तुझ्यासाठी सिगरेटस्हि आणतो. तोपर्यंत तुम्ही गप्पा मारा."

रेळे निघून गेल्यावर मी रोमाला विचारलं,

"रेळेचं कसं काय चाललंय ?"

"त्यांचं ना ? त्यांचं कसं काय चालायचं ? उत्तमच चाललंय ! आमचं लग्न झाल्यानंतर त्यानी आपली पहिली नोकरी सोडली. माझ्या वडीलानी त्याना आपल्याच कंपनीत संशोधक अधिकारी म्हणून लावून घेतलं. अगदी आराम असतो बघा त्यांना. सकाळी तासभर जातात. येतात. दुपारी झोपा काढतात. मग परत संध्याकाळी तासभर जातात. वरं, पगारही भरपूर दिलाय. तर एकूण काय, आम्ही सोळा आणे आनंदात आहोत."

तिच्या भाबडेपणाचं मला फार समाधान वाटलं. मी आडून कानोसा घ्यायच्या मिषाने विचारलं,

"आपले जुने वर्गमित्र भेटतात का कधी ?"

"नाही बापडे. तुम्हाला भेटतात ?"

"फारसे कुणी दिसत नाहीत. राजवाडे मात्र अधूनमधून भेटतो. माहिती आहे की नाही तुम्हाला राजवाडे ?" मी खोचून विचारलं. मला ओरखडा काढायची लहर आली होती.

"इश्श ! माहिती आहे म्हणून काय विचारता ? अहो, त्या राजवाड्याने तर मला लग्नासाठी मागणीही घातली होती. पण आम्ही त्याला परस्परच कटवला. पण पुन्हा तो सापासारखा उपटला बघा !"

मला ह्या विधानाचं आश्चर्यच वाटलं. मी तिच्या विधानाची फोड करायला सांगणार इतक्यात तीच सांगू लागली,

"ह्या आमच्या घराचे मालक आहेत दातार म्हणून. त्यांची एक प्रमिला म्हणून अल्लड मुलगी आहे. तीनदा मॅट्रिकला बसली; पण पास म्हणून कशी ती होत नाही. दरवेळी इंग्रजीत गोता खातेय. तर तिचे वडील दातारसाहेब एकदा सकाळचे माझ्याकडे आले नि म्हणाले, "आजकाल मॅट्रीक असल्याशिवाय काही लग्नाच्या बाजारात मुलींना कुणी विचारतच नाही, तेव्हा आमच्या प्रमिलेला घरी शिकवणीला मास्तर ठेवायचे असा माझा विचार आहे. त्यानी फक्त तासभर तिला इंग्रजी शिकवायचं. ती हुशार आहे. वरं, तिला अभ्यासाला स्वतंत्र खोलीही आहे. एकदा त्यानी दार बंद करून घेतलं की तिला कुणी त्रासही देणार नाही, कारण घरात इतर कामासाठी नोकर माणसं आहेतच. तर, तुमच्या कॉलेजात कुणी राजवाडे म्हणून चांगला हुशार स्कॉलर मुलगा होता असं मला कळलंय. त्याला शिकवणीसाठी विचारायचं ठरवलंय मी. पण परस्पर त्या राजवाड्याना विचारण्याच्या अगोदर म्हटलं तुमच्याकडून त्यांची माहिती काढलेली बरी. हो, आजकाल तरुण मुलगी एखाद्याच्या स्वाधीन करायची—मग ती शिकवणीसाठी म्हणून का होईना—म्हणजे माणसाला दहा वेळ विचार करावा लागतो !" दातारसाहेबानी असं सांगितल्यावर प्रसंग काय येऊ घातलाय ते मी तावडतोब हेरलं. प्रमिलेच्या शिकवणीच्या निमित्ताने राजमान्य राजश्री राजवाडे इथे येऊ लागणार. अशी नाही तशी मी त्याच्या दृष्टीला पडणारच. मी दिसले की परत त्याचं मन माझ्याकडे लागणार; प्रमिलेकडे तो काहीतरी खरं खोटं बोलणार; उच्चारणार. पुढे त्याची वाच्यता दहा दिशानी होणार. अखेर कधी ना कधी ते रेळ्यांच्या कानावर पडणार. आणि ह्या सर्वाचं फळ काय ? तर ह्यांच्या मनात संशय उत्पन्न होऊन ह्या भरल्या संसारात मी निष्कारणी होरपळून निघणार. त्यापेक्षा म्हटलं नकोच नं ती भानगड ! तेव्हा दातारसाहेबाना मी चक्क सांगून टाकलं, "दातारसाहेब, तुमची मुलगी तरुण आहे नि तशीच अननुभवी आहे. उलट, राजवाडे हा माणूस हुशार असला तरी अट्टल आहे. तेव्हा, त्याच्यापासून तुम्ही सावध रहावं इतकंच मी शेजारी ह्या नात्याने तुम्हाला सुचवून ठेवत्ये.

**'प्रदीर्घ कथा'**



'शेर काश्मीर'ने पुन्हा एकदा सशस्त्र बंडाची धमकी दिली

अनुक्रमणिका



प्रमिलेच्या ठिकाणी जर माझी बहीण असतीत तर मी काही राजवाड्याना शिकवणीला ठेवलं नसतं. ह्यात सारं काही आलं." तशी दातारसाहेबांच्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला आणि ते म्हणाले, "पाहीलंत. केवळ देवाची दया म्हणून तुम्हाला विचारायची मला बुद्धी झाली. तुम्ही इतकं सांगितलंत हेच खूप झालं. पण आता नवीन शिक्षक कसा आणि कुठे शोधायचा ? काय दिवस आल्यायत पहा! शिकवणीसाठी म्हणून मास्तर मिळायला कबूल नाहीत बघा ! तुमच्या माहितीत आहे का कुणी ?" आलेली संधी हेरून मी म्हटलं, "आमचे हे दुपारभर घरात मोकळे असतात. त्यांना मी सांगू शकते. पण तुम्ही मात्र असा गैरसमज करून घेता कामा नये की आपल्या यजमानाना चार पैसे मिळावेत म्हणून ह्या बाईने आपलं घोडं पुढे दामटलंय. हो, कारण गैरसमजावरून गैरसमज वाढत जातात नि अखेर असलेलं प्रेमसुद्धा नाहीसं होतं." ह्यावर दातारसाहेब म्हणाले, "रेळेबाई, तुमच्याविषयी आणि आम्ही गैरसमज करून घेणार ? अशक्य आहे. रेळेही पदवीधर आहेत. अनायासे दुपारी तेही मोकळे असतात. तेव्हा त्याना विचारा की ते आमच्या प्रमिलेला शिकवतील का ? नि मग मला निरोप पाठवा." हे सगळंच माझ्या पथ्यावर पडलं. राजवाडेने इकडे यायचं संकट परस्परच निकालात निघालं. ती इडापीडा टळली. रानातल्या वाघाला चूड दाखवून आपण घरात आणलं नाही ह्याचं मला समाधान मिळालं. शिवाय पुरुषानी आख्खी दुपार घरात लोळत काढलेली मला बिलकूल पसंत नाही. तेव्हा दातारांच्या प्रमिलेची ही आयतीच दारात चालून आलेली शिकवणी पत्करायची मी रेळेंवर जबरदस्तीच केली. आता आमचं सगळं काही नीट, सुरळीत चाललंय. हे शिकवणीत चांगलेच रमल्यायत्. पूर्वी दररोज दुपारी ढाराढूर झोपायचे. आता चांगले दोन-दोन तीन-तीन तास शिकवायला जातात. शिवाय कुणाची कटकट नसते. दातारांकडे ह्याना शिकवणीसाठी स्वतंत्र खोली दिल्याय. एकादा ह्यानी दार ओढून घेतलं की ह्याना कुणी त्रास द्यायला जात नाही. शिवाय महिन्याकाठी ह्यांच्या हातावर पन्नास-साठ रुपयांची खिरापतही पडते. आणखी काय हवंय आपल्याला ? नि सर्वात मुख्य म्हणजे अगोदर मी निर्धास्त झाल्ये !

ह्यावर कोण काय बोलणार ? तथापि काही तरी बोललंच पाहिजे म्हणून मी म्हटलं,

"एकूण काय, तर आनंदी आनंद आहे ! तुमचा हा सगळा संसार नि हे सगळं सुख पाहून माझं असं ठाम मत झालंय की आमचा रेळे बेटा नशिबाचा मोठा शिकंदरच निघाला बुवा !"

त्याच वेळी दार उघडून आत आलेल्या रेळेच्या कानी माझे शब्द पडले असावेत कारण आत पाऊल टाकीत तो मला म्हणाला,

"नशिबाचं हे असंच असतं. एक तर ते देवाकडूनच घेऊन यावं लागतं. मिळवीन म्हटल्याने चांगलं नशिब मिळत नाही आणि नशिबात असलेल्या चांगल्या गोष्टी नको म्हटल्याने टळतही नाही नि टाळताहि येत नाहीत. म्हणून नशिबाने जे आयुष्य आपल्या वाट्याला येईल ते आपण अगदी यथेच्छ उपभोगलं पाहिजे. माणसाने कसं गोडी चाखत चाखत जगावं आणि अगदी निर्धास्त रहावं."

रेळेचं हे म्हणणं शंभर हिश्श्यानी मान्य करणं मला भागच होतं कारण मी पाहात होतो की नशिबी असलेला रोमाबरोबरचा संसार रेळे मोठ्या तृप्तीने आणि खुषीने करीत होता आणि प्रमिलेबरोबरचा प्रेमालाप अगदी चव चाखीत चाखीत निर्धास्तपणे करीत होता ! नशिबाने टाकलेला डाव त्याने मानला होता.

त्याने दिलेलं जेवण, जे माझ्या नशिबात लिहिलेलं होतं, ते मी चवीने जेवून घेतलं. त्या निर्धास्त दांपत्याचं ते उमदं आदरातिथ्य यथेच्छ उपभोगलं आणि निदान आज तरी खानावळीची वाट धरायला नको ह्या सुखद विचाराने निर्धास्त झालो.

इथवर सारं असं झालं आणि आमच्या राजवाडेच्या नशिबात काय लिहिलेलं होतं ? नियतीने त्याला कुठल्या उन्हात उभं केलं होतं ?

राजवाडे मला वारंवार भेटतो. पूर्वी जखम ओली होती तेव्हा म्हणायचा, "तू काहीही म्हण मित्रा, पण एक गोष्ट खरी की ह्या भूमीवर न्याय म्हणून कसा तो उरलेला नाही बघ! इथे कुणाला श्रेय म्हणून कसं ते मिळणार नाही. म्हणून परदेशी स्थायिक व्हायचा विचार आहे माझा. त्या परदेशी भूमीवर मला माझ्या श्रेयाची वाट मोकळी होईल नि माझा मी स्वत:लाच न्याय देऊ शकेन."

राजवाडेच्या ह्या भाषेलाही आता पंधरा वर्षं होऊन गेली. अजूनही तो ह्याच शापित भूमीवर आयुष्य जगत आहे. परदेशी काही गेलेला नाही. वाटल्यास, जाऊ शकला नाही असं म्हणूया. कारण ते त्याच्या हातचं नसेल. लग्न न करणं मात्र त्याच्या हातचं होतं. त्याप्रमाणे त्याने अजूनही लग्न केलेलं नाही. इथेच, ह्याच भूमीत, नशिबात असलेलं एकटं एकटं जीवन तो न बदलता जगत आहे. त्या एकाकी जीवनाच्या चवीची हमी कुणी द्यावी ? एक गोष्ट मात्र सोळा आणे सत्य आहे की नियतीने नशिबी कोरलेलं एकपदरी आयुष्य ओढताना राजवाडेला विलक्षण निर्धास्त वाटतं. स्वत:च्याच आयुष्याच्या पटाकडे त्रयस्तपणाने पहाण्याची दुर्लभ सिद्धी मात्र ह्या एकाकी जगण्यामुळे त्याला प्राप्त झालेली दिसते. अलीकडे कधी कधी तो सांगतो, "एका गोष्टीचं मला फार समाधान आहे गंगोळी: आपण आपल्या आयुष्यात कधी कुणाला रडवलं नाही; आपण स्वत: कधी रडलो नाही. नशिबाने दान दिलेलं आयुष्य आपण न रडता जगलो. आणि सर्वात चांगली गोष्ट म्हणजे आपल्या पाठीमागून कुणी रडणारही नाही. बोल, ह्यालासुद्धा एक प्रकारचं बलवत्तर नशिब लागतंच की नाही ?"

एका अर्थी हे खरं आहे. पण एका अर्थीच कां ? अरे राजवाडे, ह्यालाच नव्हे तर जगात प्रत्येक गोष्टीलाच नशिब लागतं. तुझ्यामागून कुणी रडो वा न रडो; पण निदान तू जगत असताना कुणी तरी तुझ्याबरोबर हसावं, इतकं अल्प दान तुला नशिबाने द्यावं असं मात्र मला अगदी मनापासून वाटतं.

●●●




इयत्ता ५, ६, ७ मधील विद्यार्थी आणि नव्यानेच इंग्रजी शिकणारांना अत्यंत उपयुक्त आणि संग्राह्य

# इंग्रजी संभाषणाचा ओनामा

FIRST STEPS IN ENGLISH CONVERSATION

लेखक : प्रो. एम्. के. देशपांडे, एम्. ए.

पृष्ठे ३४४. मूल्य ४ रुपये

इंग्रजी शिकायला सुरुवात करतानाच ▪ सहज समजेल असे विवेचन करीत ▪ आवश्यक व्याकरणासह निर्दोष वाक्यरचना शिकवीत ▪ रोजच्या व्यवहारातील छोटी छोटी संभाषणे देत ▪ इंग्रजी बोलण्याची भीती दूर करीत ▪ निर्दोष आणि सफाईदार इंग्रजी बोलण्याची गोडी लावणारे मराठीतले पहिलेच पुस्तक.

**अपूर्व सवलत** प्रसिद्धी दिनांक : १६ जून १९६८. प्रसिद्धीपासून ३० जुलै १९६८ पर्यंत प्रमुख पुस्तकविक्रेत्यांकडे **फक्त साडेतीन रुपयांत** मिळेल. पोस्टाने मागविणारांनी चार रुपये मनीऑर्डरने पाठवावे.

**मॅजेस्टिक बुक स्टॉल**, गिरगाव नाका, मुंबई ४ : शनिपाराजवळ, पुणे २




इयत्ता ८, ९, १०, ११ व कॉलेज विद्यार्थी यांना अत्यंत उपयुक्त आणि संग्राह्य

वसंत देवराम ठाकूर लिखित

# इंग्रजी संभाषणकला

THE ART OF ENGLISH CONVERSATION

पृष्ठे ५१८ मूल्य ६ रुपये

या पुस्ताकाच्या साह्याने इंग्रजी वाक्यरचनेचे तंत्र आणि इंग्रजी संभाषणशैली आत्मसात करता येईल. व्याकरण–विभाग इंग्रजी वाक्यरचनेचे रहस्य सांगेल. ● संभाषण-विभागातील 'हरघडी, हरठिकाणी उपयोगी पडणारे संवाद', आणि सुमारे '५००० संभाषणोपयोगी वाक्ये' यांची प्रॅक्टिस करता करता तुम्ही सफाईदार इंग्रजी बोलू लागाल.

## इंग्रजीच्या अभ्यासकांसाठी आणखी काही पुस्तके

| | |
|---|---|
| **मॅजेस्टिक इंग्लिश टीचर** : एस. जी. गुप्ते ... ... ... | २.५० |
| **पर्फेक्ट इंग्लिश टीचर** : गुप्ते आणि भाटे ... ... | ३.५० |
| **मॅजेस्टिक इंग्रजी-मराठी पत्रव्यवहार** : ए. एन. गुप्ते ... ... | ४.०० |
| **दि आर्ट ऑफ इंग्लिश लेटर रायटिंग (मराठी विवेचनासह** : प्रो. एम. के. देशपांडे) ... | ७.७५ |






अनुक्रमणिका

## खुसखुशीत विनोदी कथा



—पंडित क्षीरसागर

**जगात** माणसावर काय काय प्रसंग ओढवतील ते सांगता येत नाही. मानवी जीवनच मुळी चमत्कृतींनी भरलेले आहे. पण माझ्यावर जो प्रसंग गुदरला तसा कोणावरही आला नसेल आणि तसा प्रसंग कोणावरही न येवो अशीच माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे. सांगतो, सारे काही सांगतो. तत्त्वज्ञानाचे डोस न पाजता प्रसंग सांगावा असेच तुमचे म्हणणे आहे ना ? तेच करतो.

तनुजाचे व माझे लग्न नेहमीच्या रीतीप्रमाणे पाहूनच झाले होते. आमचा प्रेमविवाह नव्हता. तेव्हा उगीच खोट्या-नाट्या गोष्टी सांगून आमचा प्रेमविवाह झाला असे म्हणून गोष्टीची लज्जत वाढवीत नाही. मी तिला पहायला गेलो. ती मला पसंत पडली. तिलाही मी पसंत पडलो आणि एका शुभमुहूर्तावर आमचे शुभमंगल झाले.

लग्नाच्या आधी. मी, आमच्या लग्नानंतर आम्हाला मधुचंद्र साजरा करता येईल अशा बेताने, महाबळेश्वरला एका हॉटेलात एक खोली रिझर्व्ह करून ठेवली होती. वैशाखासारख्या उकाड्याच्या दिवसात नगरसारख्या ऊष्ण हवेच्या ठिकाणी मधुचंद्र साजरा करणे म्हणजे आगीत भाजून निघण्यासारखे होते. शिवाय मधुचंद्राबद्दल माझ्या काही खास कल्पना होत्या. म्हणून मी मुद्दाम महाबळेश्वरला जायचे ठरवले होते.

लग्न झाले. सर्व धार्मिक विधी आटोपेपर्यंत रात्र झाली. दुसऱ्या दिवशी पहाटेच आम्ही एका स्पेशल मोटारने महाबळेश्वरला जाण्यासाठी निघणार होतो. परंतु हं ! लग्नाच्या दिवशी माझ्या लक्षात एक गोष्ट आली होती. पण लग्नासारख्या आयुष्यातल्या महत्त्वाच्या प्रसंगात त्या गोष्टीचे गांभीर्य माझ्या लक्षात आले नव्हते व त्याच गोष्टीमुळे माझ्या मधुचंद्राचा साफ विचका उडणार याची मला कल्पनाही नव्हती.

लग्नाच्या दिवशी एक पाचसहा वर्षांचा मुलगा सारखा तनुजाबरोबरच होता. लाजाहोमाच्या वेळी तनुजेच्या एका बाजूला मी तर तो दुसऱ्या बाजूला बसला होता. आंतरपाट धरला त्यावेळीही तो तनुजेचा शालू धरूनच उभा होता. एवढेच नव्हे तर लग्न लागल्यावर आहेर स्वीकारण्यासाठी आम्ही दोघे कोचावर बसलो



**महाबळेश्वरचे रम्य वातावरण, हनीमून हॉटेलातील सुसज्ज खोली, नुकतेच लग्न लागून तेथे आलेले तरुण जोडपे, तेव्हा आयुष्यातला तो पहिला आनंद उपभोगण्यात उणीव तरी कसली होती ? उणीव नव्हती, पण....**

---

तेव्हा तो आमच्या दोघांच्या मध्ये बसला होता. इतर लहान मुले दिवसभर मांडवात आनंदाने हुंदडत होती. पण हा पठ्ठ्या त्यांच्यात कधी खेळायला गेला नाही. सारखा तनुजेचा पदर धरून होता.

आहेराच्या वेळी तो आमच्याबरोबर कोचावर बसला तेव्हा मी त्याला म्हणालो, "ती बघ मुलं कशी खेळत आहेत. तुला खेळायला आवडत नाही का ? तू त्यांच्यात खेळायला कां जात नाहीस?"

"मी नाही खेळायला जाणार ? मला ताईजवळच बसायला आवडतं." माझे बोलणे ऐकून तनुजा म्हणाली, "त्याला किनई, माझा फार लळा आहे. माझ्याजवळ चोवीस तास असतो. रात्री झोपतोही माझ्याजवळ."

हे ऐकून मी चकीतच झालो. एका पांचसहा वर्षाच्या मुलाला आईपेक्षा बहिणीचा लळा असावा याचे मला आश्चर्य वाटले. मग कशाला लोक आईची थोरवी गातात व तिच्यावर कविता करतात? पण म्हटले, जाऊ दे. उद्या महाबळेश्वरला गेलो म्हणजे आपोआपच त्याचा लळा कमी होईल.

रात्री वरातीलाही तो मुलगा आमच्या दोघात बसला होता. पण त्यावेळेस मला इतके वाईट वाटले नाही. कारण वरातीच्या मोटारीत नवराबायकोखेरीज पाचपंचवीस पोरे दाबून कोंबून बसवण्याची प्रथा मला माहीत होती. रात्री मी वऱ्हाडातच एका कोपऱ्यात दुसऱ्या दिवसाच्या मधुचंद्राची स्वप्ने रंगवत झोपी गेलो.

पहाटे उठलो. सर्व तयारी करून मोटारीत बसण्यास आलो. तनुजेचीही तयारी झाली होती. श्वशुरानी सामान मोटारीत ठेवले. श्वशुर व माझे तीर्थरूप जपून जा असे सांगत होते. मी बारकाईने आजुबाजूला पाहिले. तनुजेचा लळा असणारा तो छोकरा दिसत नव्हता. पहाटेची वेळ असल्याने तो अजून झोपेत असावा. मला हायसे वाटले.

तनुजा मोटारीत बसली. मीही बसलो. पण मोटारीत शिरताच मला मोठा धक्का बसला. कारण बहिणीचा लळा असणारा तो कारटा आधीच मोटारीत बसला होता. चांगले नवीन कपडे घालून बसला होता. त्याला पहाताच माझी बोबडी वळली. मी बोबड्या आवाजातच श्वशुराना म्हटले, "त्या मुलाला आता बाहेर घ्या."

श्वशुर हसले. सासूबाईही हसल्या. विशेष म्हणजे तनुजाही हसली. श्वशुर म्हणाले, "तुमच्या म्हणण्याचा रोख ध्यानात आला. पण त्याचं काय आहे की त्याला तनुजेचा फार लळा आहे. तिच्याखेरीज तो अगदी रहात नाही. जेवतही नाही तिच्याशिवाय."

मी मनात विचार केला. आता नरमाईने वागलो तर घोटाळा होईल. थोडा कडवटपणा स्वीकारला पाहिजे. मी म्हटले, "मुलासकट आम्ही जाऊ शकणार नाही. ते योग्य नाही, बरं. नाही, ठीक तर नाहीच नाही. त्याला खाली घ्या."

आता सासूबाई म्हणाल्या, "अहो तो खाली उतरायचा नाही. फार हट्टी आहे गुलाम !"

"गुलाम काय ? राजाराणीमध्ये गुलामाचा काय संबंध ? दाखवतोच गुलामाला ! आता मीच पुढाकार घ्यायचा ठरवला. मी त्या मुलाला म्हटले "बाळ खाली उतर."

बाळ म्हणाला, "मी नाही उतरणार. मला ताईबरोबर यायचंय."

मी म्हणालो, "तू खाली उतरलास तर मी तुला खूप खाऊ देईन. उतर बरं."

"नाही उतरणार !"

"उतरलं पाहिजे. मी तुझ्या ताईला घेऊन परत येणार आहे."

"नाही. मला आताच ताईबरोबर यायचं आहे." आणि त्याने तनुजेला घट्ट मिठी मारली.

आमच्या संभाषणाकडे आजुबाजूचे लोक आनंदाने पहात होते. काही लोकांची तर खूप करमणूक होत असावी असा भाव त्यांच्या चेहऱ्यावर होता.

आता मी चिडलो. मी त्या मुलाचा हात धरला व त्याला ओढून म्हटले, "उतर."

त्याचा हात धरल्याबरोबर त्याने जे भोकाड पसरले की ज्याचे नांव ते. कुमुहूर्तावर जन्मलेले एखादे अवलक्षणी कारटेही रडले नसेल अशा भयानक आवाजात तो रडू लागला व त्याबरोबर हातपायही झाडू लागला.

सासूबाई माझी कीव करीत म्हणाल्या, "असू द्या हो ! तो राहणार नाही तिच्याशिवाय."

माझे मेव्हणे विनोद करीत म्हणाले, "अहो तो लौकर झोपतो. त्याचा तुम्हाला अजिबात त्रास होणार नाही." व स्वतःच खूप मोठ्याने हसले—पण आजुबाजूचे लोक हसत नाही हे पाहिल्यावर तोंडात मारल्याप्रमाणे गप्प झाले.

तनुजाही म्हणाली, "असूद्या त्याला. मी त्याचा तुम्हाला काही त्रास होऊ देणार नाही."

एवढा वेळ ते कारटे रडतच होते व हातपायही झाडीतच होते. इतका वेळ गप्प असलेले आमचे तीर्थरुपही आता म्हणाले, "राहू दे म्हणतात तर राहू दे. लहान तर पोरगा आहे. देऊन देऊन किती त्रास देईल ?"

पांच पन्नास मंडळी मी त्याला मोटरीत राहू द्यावे म्हणून मला उपदेश करू लागली. मला वेड लागणार असे वाटू लागले. मग मीही जोराने म्हटले, "राहू दे तर राहू दे". असे म्हणून मी मोटरीचे दार जोराने लावले.

आता मी कपाळावर हात मारला. लग्नाच्या मुहूर्ताच्या वेळी कोणता तरी ग्रह आडवा आला असावा. त्याखेरीज असे होणार नाही.

मग तो आपल्या वहिणीबरोवर बोलत बसला. मी मुकाटयाने माझ्या कॉटवर पडलो. त्या दोघांच्या गप्पा चालू होत्या. मला केव्हा झोप लागली ते कळलेही नाही.

जागा झालो तो सकाळ झाली होती. उठून वघतो तो भाऊवहीण आधीच उठले होते व न्याहारी करीत होते. मीही रागारागाने सर्व आवरून न्याहारी करू लागलो. मी रागावलो आहे हे तनुजाने ओळखले. तिने माझी क्षमा मागण्याचा प्रयत्न केला. पण मी तिला साफ सांगितले, कालच्या सारखा प्रसंग आज घडून उपयोगी नाही.

दुसरा दिवस आम्ही इकडे तिकडे भटकण्यात घालवला. बाळचा पुन्हा टारझनचा सिनेमा पहाण्यास चल म्हणून वहिणीला आग्रह करीत होता. पण मी साफ नकार दिला व तनुजेला म्हटले, "तुम्हाला जायचं असलं तर जा. मी येणार नाही." तनुजाने बाळयाची कशीतरी समजूत घातली व आम्ही परत हॉटेलवर आलो.

जेवणे झाली. मी माझ्या कॉटवर मासिक वाचीत पडलो होतो. पण माझे लक्ष बाळ्या कधी झोपतो याकडे होते. पण बेटा ११ वाजले तरी झोपण्याचे चिन्ह दिसेना. सारखा वहिणीला काय सांगत होता कोणास ठाऊक व तीही मान हलवीत बोलत होती. खरे सांगतो, मी मासिकातल्या तीन विनोदी गोष्टी, दोन गंभीर गोष्टी, एक भूतकथा, एक रहस्यकथा, एक वासूनाका कथा इतक्या कथा वाचल्या. राजकारणावर एक नीरस लेखही वाचला. इतकेच नव्हे तर वर्गणीदारांसाठी, लेखकांसाठी असा संपादकांचा खुलासाही वाचला. संपादक, मुद्रक, प्रकाशक मालकपासून येथे प्रसिद्ध केले हाही मजकूर वाचला. पण तो गुलाम काही झोपेना.

मला तर आता झोप यायला लागली. मग मी मासिक ठेवून दिले. एवढयात बाळ्या झोपला. मी सुटकेचा श्वास सोडला. जरा वेळ मुद्दामच जाऊ दिला. हेतु हा की बाळ्या नीट गाढ झोपावा. मग हळूच उठलो. तनुजाला माझ्या कॉटवर बोलावले. ती लाजत लाजत आली. मी तिला हृदयाशी घट्ट धरले. मग तिची हनुवटी वर उचलून तिचे मुख वर केले व चुंबनासाठी तिच्या लालचुटूक ओठावर माझे ओठ टेकणार तोच ते कारटे किंचाळत उठले. तनुजा घाईघाईने दूर झाली. व त्याला विचारू लागली. तो म्हणाला, "मला स्वप्न पडलं. एक मगर आपल्या खोलीत आली होती."

"मगर ?"

"होय मगर."

"अरे वेडया, मगर आपल्या खोलीत कशी येईल ?"

"अग शप्पत, आली होती. त्या मगरीचा चेहरा यांच्या सारखा होता." इथे त्याने माझ्याकडे बोट दाखवले व पुढे म्हटले, "आणि ताई ती मगर खाण्यासाठी तुझ्या तोंडावर तोंड ठेवीत होती."

बापरे ! मी घाबरलो. म्हटले, याने चुंबनाचा प्रसंग पाहिला की काय ? का हा योगायोग असावा ?

आता मी त्याला म्हटले, "बाळ मगर कोठे रहातात ?" तो म्हणाला, "पाण्यात."

"मग आपल्या खोलीत पाणी आहे का ?"

"नाही."

"मग मगर येथे कशी येईल ? मगरी नदीत व समुद्रात असतात. कळले ना ?"

"हो."

"तू तो टारझनचा सिनेमा पहायला नको होतास. तू तो पाहिलास म्हणून सिनेमातले वाघ, मगरी तुला स्वप्नात दिसायला लागल्या. आता स्वस्थ झोप वघ."

"मला झोप येत नाही."

तनुजा म्हणाली, "मी गाणं म्हणू का ? म्हणजे तुला झोप येईल." ते बाळ उर्फ गुलाम म्हणाला, "तू नको. याना गाणं म्हणू दे."

"काय मी ?" मी किंचाळत पाच फूट उंच उडी मारली. "माझ्या बापानं तरी गाणं म्हटलं होतं का ? ही काय चेष्टा आहे ? मला नाही गाणंबिणं येत !"

"प्लीज." तनुजा रडवेपणाने म्हणाली, "जरा त्याच्या मनाप्रमाणं घ्या. नाही तर तो रडून आकांत करील."

"पण मला गाणं नाही येत."

"कोणतंही म्हणा. सिनेमातलंही चालेल."

आता पंचाईत आली. तो बाळयाही गाणं म्हणा म्हणून आता ओरडू लागला होता. तेव्हा मी सैगलचे ते अमर गाणे म्हणू लागलो. "सोजा राजकुमारी सोजा."

पण माझा आवाज ऐकल्यावर बाळ्या खदखदून हंसू लागला.

**साहसकथा—**




**शेवटी सध्या संस्थानिकांच्या सवलतीच काढून घ्याव्यात असे तूर्त ठरले....**

श्वशुर हात जोडीत म्हणाले, "जावईबापू रागवू नका. माफ करा."

पण मी ड्रायव्हरला गाडी सुरू करण्यास सांगितले. गाडी सुरू झाली. आता त्या कारट्याला मी एका बाजूस बसण्यास सांगितले. एरवी लहान मुले खिडकीजवळची जागा पाहिजे म्हणून हटून बसतात. पण हा मुलगा अगदी आमच्या दोघांमध्ये बसला होता. अस्सा राग आला. पण करतो काय ?

महाबळेश्वरला पोचलो. हातपाय धुवून जेवण घेतले. संध्याकाळी जरा फिरून यायचा विचार केला. तनुजेला तयारी करण्यास सांगितले. पण हा पोरगा तिच्या आधी तयार झाला होता. आम्ही बाहेर पडलो. महाबळेश्वरला खूप थंड वाटत होते. एका ठिकाणी तंबूत सिनेमा आला होता. जंगल मे टारझन असा कोठला तरी चित्रपट होता. सिनेमाची पोस्टर्स पहाताच बाळ ओरडला, "ताई, मला सिनेमा पहायचाय."

सकाळपासून माझी रागावलेली स्थिती तनुजेच्या लक्षात आली होती. तिने त्याला दटावले, "सिनेमा आज नाही. उद्या पाहू."

पण ते पोरगे गुणी पडले ना ! त्याने लगेच भोकाड पसरले. त्याबरोबर आजूबाजूचे लोक चमत्कारिक नजरेने आमच्याकडे पाहू लागले. जास्त शोभा नको म्हणून मी म्हटले, "चला पाहू या सिनेमा."

सिनेमा पहातानाही तो मुलगा आमच्या मध्येच बसला होता. दुःखात सुख एवढेच की मी पाठीमागून तनुजेच्या खांद्यावर हात टाकला तेव्हा तिने माझ्या बोटात आपल्या हाताची बोटे गुंफून प्रतिसाद दिला. त्यामुळे मी खूष झालो. बाळ सारख्या टाळ्या वाजवीत होता. ओरडत होता. एकंदरीत पोरटे भलतेच खूष झालेले दिसले. मीही दुधाची तहान ताकावर म्हणून तनुजेच्या हात दाबण्यावर खूष होतो.



सिनेमा पाहून हॉटेलातील खोलीवर आलो. आमच्या शेजारीही एक जोडपे हनीमूनसाठी आले होते. जेवण झाल्यावर मी जरा वेळ गॅलरीत येऊन उभा राहिलो. तो शेजारचा मनुष्यही सहज जवळ येऊन उभा राहिला. तो म्हणाला, "तुम्हीही हनीमूनसाठीच ना?"

"अर्थात्च !" मी रुबाबातच म्हटले.

"पण तो पोरगा ?"

बापरे ! आता माझा रुबाव गळाला. तो मुलगा त्याला माझ्या पहिल्या बायकोचा अगर तनुजेच्या पहिल्या नवऱ्याचा असेल असेही वाटण्याचा संभव होता. आमच्या दोघांचा हा दुसरा हनीमून असावा असा गैरसमज होणे शक्य होते. त्यामुळे तो शेजारी माझ्याकडे चमत्कारिक नजरेने पहात होता. मी घाईघाईने खुलासा केला, "तो तिचा भाऊ आहे. त्याला म्हणे तिचा लळा आहे व रात्रीही तो तिच्याजवळच झोपतो."

"म्हणजे ?" त्याने चकित मुद्रेने म्हटले. त्याच्या मुद्रेवर मग आता रात्री तुमचे कसे होणार असा भाव दिसत होता. "म्हणजे तेच !" असे घाईघाईने म्हणून मी खोलीत आलो व दार लावून घेतले.

खोलीत दोन कॉट्स होत्या. एका कॉटवर तनुजा व बाळ पडला होते. मीही दुसऱ्या कॉटवर पडलो. पण बाळचा काही लवकर झोपेना. सारखा टारझनच्या गंमती वहिणीला सांगत होता व खिदळत होता. आता हा केव्हा झोपणार कोणास ठाऊक ?

मला झोप यायला लागली. पण बाळचा झोपायचे काही चिन्ह दिसेना. तनुजाचाही चेहरा आता केविलवाणा दिसू लागला. तिच्या चेहऱ्यावर माझी क्षमा मागण्याचे भाव दिसत होते. एकंदरीत तिचाही या गोष्टीला नाईलाज असावा.

शेवटी एकदाचा तो गुलाम झोपला. मला हायसे वाटले. हळूच उठलो व त्या कॉटजवळ तनुजाचा हात धरला. त्याबरोबर ती लज्जित झाली. मी एकदम मोहरून गेलो. तिला धरून माझ्या कॉटजवळ आणले. "तनुजा" मी घोगऱ्या आवाजात हाक मारली. तोंडाला चिकटा आल्यासारखे वाटत होते.

"काय ?" ती हळूच म्हणाली. मी तिला आपल्याजवळ ओढून घट्ट धरले. तीही मला बिलगली.

एवढ्यात बाँबहल्ल्याचा भोंगा वाजतो तसे किंचाळत ते कारटे उठले. त्याबरोबर आम्ही घाईघाईने अलग झालो.

तनुजा म्हणाली, "काय झालं रे बाळ ?"

"मला स्वप्न पडलं. त्यात वाघ आपल्या खोलीत आला होता. व पलंगाखाली लपला होता." असे म्हणून तो कॉटखाली उतरला व वाघ आहे का म्हणून पाहू लागला. माझ्या कॉटखालीही त्याने बघितले.

"मी नक्की सांगतो. वाघ आला होता. मी ओरडलो तेव्हा तो पलंगाखाली लपला. इथेच असेल." असे म्हणून तो सर्व खोलीत वाघ शोधू लागला.



## 'लोक-साहित्य' सेवक

# डॉ. सरोजिनी बाबर

डॉ. सरोजिनी बाबर ह्यांची राज्यसभेवर निवड झाली आहे हे आपणास विदित झालेले आहेच. त्याशिवाय दिल्लीला साहित्य अकादमीवरही त्यांची नियुक्ति झाली असल्याचेही साऱ्यांना ठाऊक झालेले आहेच. डॉ. सरोजिनी बाबर ह्यांचा आणि दीपावली मासिकाचा संबंध खूप जुना आहे. जणु त्या आता 'दीपावली'च्या कुटुंबातील एक घटकच बनल्या आहेत. त्यामुळे त्यांना लाभलेल्या ह्या दुहेरी व दुरंगी (एक रंग राजकारणाचा, दुसरा 'साहित्यकले'चा ) यशाबद्दल दीपावलीला साहजिकच आनंद वाटत आहे. त्यांचे मी अभिनंदन करतो. पुण्याहून त्या मुंबईत आल्या, गाजल्या. साहित्य, लोक-साहित्य व राजकारण ह्या तीन्ही आघाडयांवर त्यांनी काही महत्वपूर्ण कामगिरी पार पाडली आणि आता त्या दिल्लीकर होत आहेत. वहरत्या कर्तृत्वाला ह्याच वाटेने जावे लागते. चव्हाण, बर्वे असेच कऱ्हाड–पुणे, मुंबई–दिल्ली करीतच गेले. डॉ. सरोजिनी बाबर ह्याही दिल्लीत आपल्या 'उद्योगशील' व चिकाटी'च्या वृत्तीमुळे गाजतील. काही नवे करून दाखवतील असा मला विश्वास वाटतो.

डॉ. सरोजिनी बाबर ह्याना मी प्रथम पाहिले ते पुण्यात. त्या वेळी त्या स. प. महाविद्यालयात शिकत होत्या. प्रा. शांता शेळके ह्याही त्याच कॉलेजात शिकत होत्या. साध्या वेषातल्या ह्या दोन स्त्रिया त्यावेळी साऱ्यांचे लक्ष वेधून घेत. मग कळले की त्या शांताबाई शेळके व सरोजिनी बाबर आहेत म्हणून ! त्यावेळी ही दोन नावे नुसती नावे म्हणून स्मृतिकोषात ठेवून दिली. त्या नावामागे मग उभे राहिले कर्तृत्व, प्रज्ञा आणि अपार कष्ट आणि अनुभव, क्षमता– आणि प्रा. श्री. म. माटे यांच्या ह्या दोन्ही विद्यार्थिनींनी तोच बाह्यवेष कायम ठेवला असला तरी आपल्या साहित्यसेवेने मराठीचे अंतरंग उजळून टाकले आहे. डोक्यावर पदर घेऊन, साध्या पोषाखात वावरणारी ही स्त्री डॉक्टर सरोजिनी बाबर आहे असे कुणाला एकदम सांगितले तर त्याला ते खरे वाटण्याची शक्यता कमी. विद्वत्ता ही काही वेषावर अवलंबून नसते. पण विद्वत्ता साधली की बरीच 'वेषांतरे' होतात, 'रूपांतरे' होतात आणि 'मानसिक' स्थित्यंतरेही होतात. पण डॉ. बाबर ह्यांना पुण्यात वीस पंचवीस वर्षांपूर्वी पाहिले तशाच त्या आहेत आणि त्यांचा मनमोकळा, बोलका, आनंदी स्वभावही तसाच त्यांनी राखला आहे. तो काळ श्रद्धांचा होता. निष्ठांचा होता. ध्येयवादित्वाचा होता. कॉलेजात शिक्षणाबरोबरच निष्ठाही जडत होत्या. जपल्या जाऊ शकत होत्या. ललित लेखन तर लिहिले जातच होते. पण वाङ्मयाच्या विविध क्षेत्रात आपण काहीतरी करून दाखवावे अशा ईर्षाही पेटत होत्या. डॉ. बाबर ह्यानी ध्येयनिश्चिती केली. पित्याचा वारसा थोर होता. त्यामुळे त्यांना सुयोग्य प्रोत्साहन मिळाले. आणि मग 'लोकसाहित्या'च्या संशोधनाला प्रारंभ झाला. आज डॉ. बाबर म्हणजे लोकसाहित्य असे समीकरण जणु रूढ झाले आहे. ते साहित्य मिळविणे, त्याची शुद्धाशुद्धता तपासून घेणे, त्यावर आवश्यक ते ग्रांथिक दृष्टचा संस्कार करणे, त्यासाठी प्रवासादि श्रम करणे ह्या गोष्टी त्यांनी निष्ठेने केल्या व हे 'स्पेशलायझेशन' मिळविले. लोकसाहित्याचे काम करताना त्यांनी आपले ललित लेखनही चालू ठेवले. आपल्यातला कथाकार, कवि, कादंबरीकार गंजू दिला नाही वा लोकसाहित्याच्या घबडग्यात त्याला रुक्षताही येऊ दिली नाही. हे करीत असताना राजकीय स्तरावरही जे मान चालत आले ते त्यांनी स्वीकारले. विविध समित्यांवर कामे केली आणि आता त्या राज्यसभेवर गेल्या आहेत. त्यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा आलेख खूप बोलका आहे. 'समाज शिक्षण माले'च्या संपादिका म्हणून त्यांनी काम केले. दिल्लीला जाण्यापूर्वी त्या




''महाराष्ट्र राज्य लोक साहित्य समिती'च्या अध्यक्ष होत्या. मराठीतील स्त्रीधन व वनिता सारस्वत हे दोन प्रबंध त्यांनी लिहिले असून त्यांच्या कमळाचं जाळं, अजिता, तू भेटायला नको होतास, हिरवा चुडा, आठवतं तेवढं सांगते वगैरे कादंबऱ्या व सात आठ कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. तीन ललित निबंध संग्रह, एक काव्य संग्रह व सात आठ लोकसाहित्यविषयक ग्रंथही त्यांनी संपादित केले आहेत. स्फुट लेखनही त्यांनी विपुल केले आहे. संशोधनात्मक कामाला चिकाटी लागते. सातत्य लागते, श्रद्धाही लागते. डॉक्टर बाबर ह्यांच्या जवळ ह्या गोष्टी होत्या व आहेत. म्हणूनच त्यांनी आपले वैशिष्टच कायम राखले आहे. अशा निष्ठावन्त कला, साहित्य साधकांची थोर परंपरा महाराष्ट्रात होती व आहेही. डॉ. बाबर ह्या त्या परंपरेतल्या एक आहेत. शिक्षणाने नवा समाज घडत असतो. समाजाला नव्या निष्ठा मिळत असतात. त्या नव्या निष्ठांचे जे अग्रदूत असतात अशात डॉ. बाबर यांचा समावेश होऊ शकेल असे मला वाटते. काय करतो ह्यापेक्षा कोणत्या निष्ठेने करतो ह्याला नवनिर्मितीत महत्व असते. डॉ. बाबर ह्यांनी आपली निष्ठा अविवाद्य राखली आहे. आजचे सारे सन्मान हे त्या निष्ठेचे फलित आहे असे मी मानतो व त्याही मानीत असतील असा माझा विश्वास आहे.

डॉ. सरोजिनी बाबर ह्यांचे मी पुनश्च अभिनंदन करतो.

इतका की हसता हसता कॉटवरून खाली पडला. नंतर म्हणाला, "हॅट. तुमचा आवाज डफ्फड आहे. ताई तूच म्हण."

मी कपाळावर हात मारला. व माझ्या कॉटवर येऊन पडलो. तनुजा गाणे म्हणू लागली. ते गाणे ऐकता ऐकता मला केव्हा झोप लागली ते कळलेही नाही.

सकाळी जागा झालो तो बहीणभाऊ न्याहारी करीत होते. कमाल आहे ! याना न्याहारी करण्यास सुचते तरी कसे ?

मी तनुजाला म्हटले, "तनुजा, आज रात्री जर खोलीत वाघ अगर मगर आली तर उद्या सकाळच्या गाडीने मी तुम्हा दोघाना तुमच्या गावी पोचवून देईन. कबूल ?"

बाळचा मध्येच म्हणाला, "कबूल."

मी चिडलो. म्हणालो, "तू गप्प बैस. तुला कोणी विचारीत नाही तुझ्या वहिणीस विचारतो आहे."

तनुजा केविलवाणेपणे म्हणाली, "कबूल."

त्या दिवशी दिवसभर भटकलो. पॉइंट्स् पाहिले. एका पॉईंटवरून सूर्यास्त बघितला.

रात्री हॉटेलात आलो. जेवण करून मी माझ्या कॉटवर पडलो. व नेहमीप्रमाणे बाळचा कधी झोपी जातो याची वाट पाहू लागलो. तो मारे भगिनीशी गप्पागोष्टी करीत होता. माझ्या सुदैवाने शेवटी झोपला एकदाचा.

मी घाईघाईने माझ्याकडे तनुजाला ओढले. तिला मिठी मारून हळूच तिचे चुंबन घेतले. मी मान वळवून बाळचाकडे पाहिले. तो झोपलेला होता. म्हटले, आज प्रगती आहे. पहिल्या रात्री तनुजाचा फक्त हात धरायला मिळाला. दुसऱ्या रात्री तिला मिठी मारू शकलो व आज नशिबाने तिचे चुंबन मिळाले आहे. प्रगती होते आहे. मी हळूहळू तिच्या पाठीवर हात फिरवू लागलो. तीही आता लाडात आली होती व मला बिलगून होती. माझा हात पाठीवरून खाली सरकू लागला. एवढ्यात बाळचा किंचाळून उठला. तनुजा घाईघाईने पदर सावरीत बाजूला झाली.

मी भयंकर चिडलो. बाळचाला म्हटले, "तुझा वाघ अगर मगर यांच्याबरोबर तुलाही मार मिळेल आता !"

बाळचा शांतपणे म्हणाला, "पण आज स्वप्नात वाघ अगर मगर आलीच नाही मुळी."

"मग कां किंचाळत उठलास ?"

"आज स्वप्नात राक्षस आला होता. व तो ताईभोवती हात घालून तिला पळवून नेत होता."

मी मनात म्हटलं, बाळचा, तुझ्यासारखा राक्षस असता दुसरा राक्षस येथे येईलच कसा ?

मुकाट्याने माझ्या कॉटवर पडलो व दोन्ही हातानी डोके दाबून धरले.

भाऊबहीण बराच वेळ बोलत होती वाटते. मधून मधून दोघेही गाणी म्हणत होते. मला केव्हा झोप लागली ते कळलेही नाही.

सकाळी जागा झालो तो बहीणभाऊ न्याहारी करीत होते. उठल्याबरोबर मी चूळ भरली व न्याहारी अगर चहाही न घेता हॉटेलबाहेर पडलो. एक टॅक्सी मिळाली. ड्रायव्हरने जे भाडे मागितले ते कबूल केले व टॅक्सी घेऊन आलो. खोलीत जाऊन सर्व सामान टॅक्सीत नेऊन ठेवले. बहिणभाऊ माझ्या कृत्याकडे चकित मुद्रेने पहात होते. त्यांना म्हटले, "चला आपल्याला परत तुमच्या गावी जायचे आहे."

तनुजा रडकुंडीला आली होती. ती म्हणाली, "अहो असं काय करता ?"

"मला अरेबियन नाईटस्प्रमाणे येथे सुरस आणि चमत्कारिक रात्री घालवायच्या नाहीत. तुम्हाला तुमच्या गावी पोचते करतो. तुम्हाला सोडून मी माझ्या नोकरीच्या गावी जाईन."

"प्लीज. माझं म्हणणं एका."

"मला काही एक ऐकायचं नाही. तुम्हाला यायचं की नाही."

तनुजा चमकली. दोघेही मुकाट्याने टॅक्सीत जाऊन बसले.

तनुजेच्या गावी पोचेपर्यंत रात्र झाली होती. कारण टॅक्सी एका ठिकाणी बंद पडली होती. तिथे दोन तास फुकट गेले होते. तिच्या गावी गेल्यावर मला भूक नाही एवढेच म्हटले व माडीवरच्या खोलीत जाऊन स्वस्थ पडून राहलो.

तनुजाने घरात काहीतरी सांगितले असावे. कारण सासरे, सासूबाई अगर मेव्हणे कोणीही चौकशीसाठी आले नाही. रात्री दहाच्या सुमारास तनुजा खोलीत आली व तिने दाराला कडी लावली.

मी रागाने विचारले, "बाळचा, कुठं आहे ?"

"शू : !" तिने नाकावर बोट ठेवून मला गप्प केले, व म्हटले, "आता बोलणं बंद."

"कां ?"

तिने गालात जीभ फिरवीत म्हटले, "कां म्हणजे ?"

माझ्या लक्षात सर्व आले. आता मी सुरक्षित होतो. तो बाळचा नांवाचा वाघ, मगर व राक्षस खाली त्याच्या आईजवळ होता. आता त्याची भीति नव्हती. मग मीही तिच्या डोळ्यात रोखून पहात म्हणालो, "बोलण्यापेक्षा कर्तव्य श्रेष्ठ असंच ना ?"

"इश्श !" असे म्हणून तनुजा इतकी गोड लाजली की यंव ! एकदम तिला मिठीत घेतली.

आणि काय सांगू वाचकहो, माझा मधुचंद्र तनुजाच्या याच गावी व्हायचा आहे हे मला आधी कळले असते तर मी महाबळेश्वरला कशाला गेलो असतो?

● ● ●












# 'सूर साधक' जितेंद्र अभिषेकी

**"सर्व** देव नमस्कारं, केशवं प्रतिगच्छति' असं नेहमी म्हटलं जातं. कारण ईश्वराचे अवतार विविध असे मानले गेले असले तरी अखेर ईश्वरी आदितत्व एकच मानले गेले आहे. सर्व कलांच्या रूपाने आविष्कृत होणारे आनद तत्व व सौंदर्य तत्वही एकच आहे असे मानले जाते. त्यामुळेच कलेचा झेंडा मिरवीत ह्या देशाची शान वाढविण्यासाठी विदेशी जाणाऱ्या कलाकारांना त्या त्या क्षेत्रातील वकील, राजदूत, देशदूतच कां मानू नये ? पंडित रविशंकर, बिस्मिल्ला, अलि अकबर खाँ आणि आता जितेंद्र अभिषेकी ह्यांच्या रूपाने भारतीय सूर (व संगीत) ह्या देशाची राजकीय दृष्टया काहीशी डागळली गेलेली प्रतिमा उज्वल करण्यासाठीच गेले आहेत व त्यावावत तरी आपली (जणु) वकिलीच करीत आहेत असे म्हटले तर ते वावगे ठरू नये. जितेंद्र अभिषेकींच्या आयुष्यात हा सुयोग लवकर चालत आला असून ह्या विदेशी वकिलात ते सर्वात तरुण आहेत ही गोष्ट त्यांना व महाराष्ट्रालाही भूषणास्पद आहे (महाराष्ट्र शब्दात मी मनोमन गोव्याचा समावेश करतो. भावनात्मक ऐक्य लादावे लागत नाही. ते आतूनच स्रवते) जितेंद्राचे अभिनंदन करताना मला अनेक अर्थांनी आनंद झाला आहे. पहिले कारण म्हणजे जितेंद्र हा **दीपावलीचा** लेखक–कुटुंबीय! "दीपावली" कार्यालयातल्या गप्पातून ज्या अनेक कल्पना कार्यान्वित होतात त्यातल्या काही आता स्थिरावल्या आहेत. "संगीत विशेषांक" ही कल्पना त्यातलीच ! जितेंद्राचा थोडाफार हात भार लागलेली कल्पना ! त्यामुळे जितेंद्र विदेशी जात आहे ह्याचा फार मोठा आनंद आम्हाला झाला. दुसरे कारण जितेंद्र नुसता गायक नाही. तो कथालेखकही आहे. संगीताच्या पार्श्वभूमीवरील कितीतरी चांगल्या कथा जितेंद्राने "दीपावली"ला दिल्या आहेत. त्यामुळे जितेंद्राचे अभिनंदन करताना 'दीपावली'ला साहजिकच हर्ष होत आहे. जितेंद्र अभिषेकी हे "केल्याने होत आहे रे" वृत्तीच्या एका कर्मयोगी साधकाचे नांव आहे. जिद्द, महत्वाकांक्षा, त्यासाठी करावे लागणारे कष्ट आणि भोगावे लागणारे भोग ह्याचा परिपाक म्हणजे जितेंद्र अभिषेकी! संगीताला साधकाची, तपस्व्याची वृत्ती लागते. कुठल्याही कलेला ती वृत्ती आवश्यकच असते. तशी वृत्ती असल्याने ज्या ज्या गोष्टी केल्या त्या साऱ्या त्या साधनेच्या अनुषंगाने केल्या. ध्येयावर दृष्टि ठेवून केल्या आणि अनेक रिस्क घेऊन केल्या. लहानपणापासूनच जितेंद्राने हे सतत केले आहे. म्हणूनच त्याचा हा मंगेशी ते अमेरिका व अनाथ विद्यार्थी गृह ते अमेरिका हा प्रवास मोठा बहारदार वाटतो. तो एक अभिमानाचा विषय वाटतो.

जितेंद्र अभिषेकीचा जन्म गोव्यातील–मंगेशीचा. वडील कीर्तनकार. पूजा अर्चा व पौरोहित्य हा त्यांचा परंपरागत व्यवसाय ! त्यामुळेच त्यांचे 'नवाथे' हे मूळ नांव लुप्त होऊन ते घराणे 'अभिषेकी' झाले. जितेंद्राच्या वडिलांना गाण्याचे उत्तम ज्ञान होते. परंतु गाण्याला त्या काळी तेवढी प्रतिष्ठा नव्हती. म्हणून ते कीर्तनकार झाले. जितेंद्राचे संगीताचे संस्कार तसे बाळपणापासूनच घेतलेले. पण 'पदवीधर' होण्याची स्वप्ने पाहणाऱ्या ह्या मुलाचा व वडिलांचा ह्यावरच मतभेद झाल्याने जितेंद्र पुण्याला आला आणि त्याने अनाथ विद्यार्थीगृहात नांव घातले. मॅट्रिकपर्यंत शिक्षण घेतले. ते घेत असतानाच पाटणकरबुवा, यशवंतराव मराठे आदि बुवांकडून संगीताचे पाठ घेतले. मॅट्रिकनंतर मुंबईला आला आणि मुंबई रेडियोवर त्याचे कार्यक्रम होऊ लागले. कॉलेजचे शिक्षण सुरू केले. संगीताचेही शिक्षण सुरू केले. मास्टर नवरंग व खाँसाहेब अजमल हुसेन यांचेकडे नव्या घराण्याची गायकी मिळाली. बी. ए. नंतर नोकरी सोडली. हेतु एकच–संगीताचा व्यासंग–संगीताचीच साधना करण्याचा! सुदैवाने त्याला हात दिला व संगीत अकादमीची दरमहा २५० रुपयांची स्कॉलरशिप त्याला मिळाली. जगन्नाथबुवा पुरोहित (गुनीदास) ह्यांच्या सारखा विद्वान आणि दर्जेदार गायक गुरु म्हणून लाभल्यावर त्याच्या गाण्यात कस आला. रंगत वाढली. कीर्ति वाढली.

पण जितेंद्राला बैठकींइतकीच किंबहुना जास्त कीर्ति दिली ती त्यांच्या संगीत दिग्दर्शनामुळे! रसिक व गुणपूजक (कै.) गोपाळकृष्ण भोबे ह्यांना ह्या बाबतचे काहीसे श्रेय द्यायला हवे. 'मत्स्यगंधे'चे संगीत जितेंद्राकडे द्या असे त्यांनी सुचवले. गुण असतातच. गुणग्राहक, मर्मज्ञही जवळपास असावे लागतात. 'मत्स्यगंधे'चे संगीत आता घरोघरी पोहचले आहे. रेकॉर्डस्नी 'रेकॉर्ड' केले आहे. त्यानंतरच्या ययाति–देवयानी, लेकुरे उदंड जाली व कटयार ह्या नाटकांचा संगीतानेही जुन्या व चांगल्या परंपरेत नव्या 'प्रयोगां'ची उत्तम भर घातली आहे. 'लेकुरे' चे संगीत हे तर एक चॅलेंज होते. पण ते त्याने यशस्वीपणे स्वीकारले. कस लागला. कटयारमधील रागरागिण्या अशीच भावी कर्तृत्वाची ग्वाही देतात. जितेंद्राचे गाणे व संगीत दोन्ही रंगतदार आहे. धुंद करणारे आहे. त्यामुळेच "आजचा गायक व आजचा संगीत दिग्दर्शक" असे बिरुद त्याच्या मागे लावले जाते ते सार्थ वाटते.

जितेंद्राचा हा 'कलात्मक' नमस्कार अखेर त्या केशवाप्रत जावो आणि त्याच्या ह्या संगीत वकिलीमुळे भारताची व भारतीय संगीताची शान वाढो ही सदिच्छा! 'दैवायत्तं कुले जन्म, मदायत्तं तु पौरुषम्,' हे सिद्ध करून दाखविणाऱ्या ह्या जिद्दी व महत्वाकांक्षी तरुणाला हा भाग्ययोग लाभला हे त्याचे व आपल्या देशाचेही भाग्यच! ! अभिनंदन जितेंद्र, शतवार अभिनंदन ! !

**–आदित्य**



अनुक्रमणिका




## अफसोस ! अफसोस ! !

'**किर्लोस्कर**' नामक मासिकात प्रा. गंगाधर गाडगीळ यांनी एक 'स्फोटक' लेख लिहिला आहे. (वाचला नसल्यास वाचा आणि आपापल्या घरच्या माणसांना सांभाळा ) स्फोटक लिहिणे व स्फोटक बोलणे हा गाडगीळांचा 'प्रकृतिधर्म' आहे. पण आता त्यांनी समाजाच्या एका मूलगामी विषयालाच हात घातला असून त्यामुळे घरोघरी स्फोट झाले असण्याची शक्यता आहे. नुकतीच वटपौर्णिमा झाली. परंतु नेहमीच्या मानाने यंदा मिळकत कमी झाली अशी तक्रार भिक्षुक मंडळी करीत होती. 'जन्मोजन्मी हाच पती' ही कल्पना मध्ययुगीन, खुळी व बुरसटलेली असून ह्या जन्मी सुद्धा वैचित्र्य हवे अशी नवी मागणी जोर करीत असल्याचे त्याना (किर्लोस्करच्या) पुराव्यासहित सिद्ध करून दिले तेव्हा ह्या मंडळींनी आपले पळीपंचपात्र तिथेच टाकून पोबारा केला असेही ऐकतो. काहींनी आपापल्या घराचे कडी-कोयंडे पुन्हा पुन्हा तपासले आणि बाजारात 'नवताल' (चवचाल नव्हे) छापाची कुलपे बरीच खपली.

हा सारा त्या 'स्फोटक' लेखाचा प्रताप असे ऐकतो. किरकोळ ठिकाणी निषेध झाले असले तरी एकूण मंडळींना लेख आवडला. खाणावळीत 'चेंज' असतो, हॉटेलात 'टुडेज् मेन्यु' असतो. ऋतु पालटतात. क्षणाक्षणाला सृष्टि रूपे पालटते. मग नवऱ्याला बायको वा बायकोला नवरा अधुनमधून 'चेंज' म्हणून पालटायला काय हरकत असावी ? तार्किक दृष्टचा (गाडगीळ नेहमी तार्किक दृष्टचा बोलतात. लिहितात हे ध्यानी घ्यावे ) काय हरकत आहे ?

पण गाडगीळांच्या लेखात आपल्या प्रतिगामित्वाबद्दल बऱ्याच तक्रारी आहेत. पाश्चिमात्य (म्हणजेच प्रगत) देशात डेटिंग करत येते. तसे प्रसंग उपलब्ध करून दिले जातात. सहली, नाटके, चित्रपट, नृत्यादि ठिकाणी अविवाहित तरुण-तरुणी एकत्र येतात. त्याना एकमेकांची मने कळतात. लग्न करून 'प्रेममय' संसार करता येऊ शकतो. वगैरे विचार ते मांडतात. 'नृत्य' हा प्रकार त्याना भारीच आवडतो असे दिसते. परदेशात तरुण-तरुणींना एकत्र येता यावे म्हणून नृत्यसमारंभ असतात. अशाच प्रकारचे समारंभ आपल्याकडेदेखील सुरू झाले पाहिजेत. तरुण-तरुणींचा प्रश्न सोडला तरी आपल्या नित्याच्या जीवनात नृत्याला काहीच स्थान नसावे ही खेदाची गोष्ट आहे. नव्हे, "**ही एक विकृति आहे**" असं ते म्हणतात. आता नृत्यासाठी काही तास वाढवून देण्यासाठी व नृत्याला आवश्यक ती शारीरिक व मानसिक सुस्थिति देण्यासाठी परमेश्वराकडे बरीचशी माणसे जॉइंट अपील करणार आहेतसे ऐकतो. "दररोज होते ती नाचानाच काय कमी आहे ?" असे अभिप्राय बऱ्याच ठिकाणी ऐकू आले. "गाडीच्या फूटपायरीवर आम्ही काय करतो मग ?" असेही काही लोक म्हणाले. पण लोकहो, हे नृत्य नव्हे. नृत्य करायला स्त्री साथीदार हवा. प्रेम कसे जुळणार मग? पण नाचायला हवं मंडळी ! कारण न नाचणं हे विकृत मनाचे द्योतक आहे. पुढचा विचार त्याहून स्फोटक आहे. पण "नाचरेपणा" एकदा अंगात भिनला की तो तितकासा स्फोटक विचार वाटणार नाही. नाचरेपणामुळे आंबट चेहऱ्याने जीवन जगण्याची 'राष्ट्रीय प्रवृत्ती' (व प्रकृति) पालटेल. मग माणसे एकमेकांकडे पाहून हसू लागतील. हसू लागली की मग परिचय वाढेल. परिचय वाढला की, स्नेह आला. स्नेहाच्या पायरीवरून प्रेमाच्या (परि) राज्यात प्रवेश आणि काय मजाच मजा! आता माणसे एकमेकांच्या सहवासात आली की प्रेम करायला लागणारच, नाही का? आता प्रेम करायचं पण एकमेकांची 'शरीरं' मात्र जवळ येऊ द्यायची नाहीत 'यह क्या बात है?' तेव्हा शरीरसंबंध येणारच. ते अपरिहार्य नाही काय? आता समजा, शरीरसंबंध आलाच तर त्यात लगेच 'पाप, पाप' म्हणून बोंबलायची काय गरज ? शरीर भ्रष्ट होतं, शरीर 'पापी' असतं वगैरे कल्पना आता जुन्या झाल्या. मन मलिन होतं, शरीर भ्रष्ट होतं ह्या कल्पनातूनच आंबट चेहऱ्याने जीवन जगण्याची प्रवृत्ति बळावते. आणि ती राष्ट्रीय प्रकृति अखेर अवघे राष्ट्रीय जीवनच मलिन करते बघा! त्यापेक्षा कुठलेही दायित्व न स्वीकारता 'चेंज' (याने मौज–मजा) करणे आता शक्य झाले आहे असे गाडगीळ म्हणतात. तेव्हा ह्या पद्धतीने होणाऱ्या लैंगिक स्वैराचारा (नव्हे नव्हे मुक्ताचार) कडे आपण जरा सहानुभूतिपूर्वक पाहिले पाहिजे. याने तमाम पुरुषहो, जरा काणाडोळा करा. हॅव ए चेंज, जन्मोजन्मी हाच पति (व तो कसाही असला तरी परमेश्वर) ह्या कल्पना प्रतिगामी व खुळेपणाच्या आहेत. आताचा मानव 'उदार' झाला आहे. त्याच्या समाजव्यवस्थेत (नव्या) करारमदार आले आहेत. त्यामुळे आता विवाहविषयक भूमिकेतही 'करार' कल्पना शिरली आहे. करारात कसं जरा मोकळं मोकळं वाटतं. कुठेही गावात जाऊन 'बेल' घालता येतो. शरीर मलिन होते ही कल्पना एकदा सोडली की, मुक्तपणे शरीरसंपत्ती उधळता येते. पुन्हा दायित्व काही नाही. लुटा आणि लुटवा. प्रेम, पावित्र्य, त्याग, समर्पण, चाळीस चाळीस वर्षे







संसार, कशि या त्यजू पदाला, चितोडचा 'जोहर,' वटपौर्णिमा, सत्यवान-सावित्री—रामाच्या मागे वनवासात जाणारी सीता वगैरे साऱ्या गोष्टी आता मध्ययुगीन झाल्या आहेत. आपण कपडे नाही का पालटत ? मग अधुनमधुन शरीरे पालटून पाहिली तर कुठे बिघडले ? आजच्या स्वतंत्र (व प्रगत) जगात नव्या मानवाला एवढेही स्वातंत्र्य नसावे म्हणता ? हवेच हवे. ही शक्यता गृहित धरायलाच हवी. ब्लॉक पद्धती आणि गोदरेजची कुलुपे आता काय करू शकणार ? आणि मिया बिबी राजी असल्यावर वडावरचे 'काझी' 'सत्यवाना'ची पूजा तरी कशासाठी सांगणार ? आणि ती ऐकणार कोण ? किर्लोस्कर मासिकातला तो लेख वाचून बरीचशी माणसे अलिकडे रस्त्याने हिंडताना संरभैर दृष्टीने काहीतरी शोधीत असताना दिसतात. कार्यालयातून कामे करणारी माणसे अलिकडे बरीच सौजन्यशील झाली असल्याचे ऐकतो. मुळातच मुक्ताचारवादी असलेली (काया, वाचा, मने) माणसे एक नवे पीठ निर्माण करण्याच्या प्रयत्नात असून त्या पीठाचे शंकराचार्य म्हणून त्यांनी प्रा. गंगाधर गाडगीळ यांची एकमताने निवड केली असल्याचे ऐकतो. (एकमत वगैरे आपलं उगीच म्हणायचं. खरं तर 'ह्या' विषयाला 'ती' दोन मने (व मते) एकरूप व्हावी लागतात नाही का ?) आपल्या 'धंद्या'ला (व धंद्यांना) 'धर्म' मिळाला, 'धर्मगुरु' मिळाला व 'तार्किक' दृष्टचा हा धंदा कसा अपरिहार्य आहे हे त्याने ठसठशितपणे मांडले ह्यामुळे ही माणसे तूर्त 'तरंगत' आहेत. (कुठे व कशी ते विचारू नये.) एकूण काय धमाल उडाली आहे. माणसे खदखदून हसताहेत. नाचताहेत (आता नाचायलाच हवं. नाहीतर 'विकृत' ठरू की) गाताहेत, हिंडत फिरताहेत. माणसे हेरताहेत. 'मऊ' दिसते का पाहाताहेत, सौजन्य सप्ताह (का महिने १) पाळताहेत. शरीर 'सौंदर्य' त्यांना नव्याने प्रतीत होत आहे. "तशा" बाया सुद्धा त्यांना 'तशा' वाटेनाशा झाल्या आहेत. कारण शरीर 'मलिन' होते, पापी असते हे भ्रम आता उरले नाहीत. दृष्टि कशी स्वच्छ, उदार झाली आहे. पिस्तुले, फरशा, सुरे, विषाच्या कुप्या, वगरेंची विक्री कमी झाली आहे. माणसे रागावत नाहीत. प्रम करतात प्रेम ! प्रेमाचा विजय असो ! (कधीही मलिन न होणाऱ्या) 'मॉडर्न' शरीराचा विजय असो. 'मुक्ताचार' पीठाचा विजय असो. शंकराचार्य झिंदाबाद ! !

### राष्ट्रीय एकात्मता
### (एक चिंता व चिंतन)

दंगे झाले. जातीय दंगे झाले. राष्ट्रीय एकात्मतेचे महामंत्र गेली साठ वर्षे गायिले जात असतानाच फाळणी झाली ह्या देशाची. आणि काही भूभाग एक स्वतंत्र व सार्वभौम राष्ट्र म्हणून गणला गेला. पुन्हा ऐक्याचे मंत्र म्हटले जाऊ लागले. आता उरलेल्या राष्ट्राला एकात्म बनणे तसे अगत्याचे होतेच. असतेच. 'राष्ट्रीय एकात्मता' ही काही युद्ध (वा संकट) कालीन घोषणा नव्हे. ती एक 'स्वाभाविक' जाणीव आहे. तो एक 'धर्म' आहे. निदान असायला हवा. पण तरीही गेल्या वीस वर्षात असल्या परिषदा भरून वा वृत्तपत्रीय व व्याख्यानादि कार्यक्रमातून-प्रचारातून अजून आम्ही त्याबाबत फारसे 'मौलिक' करू शकलो नाही ही वस्तुस्थिति आम्ही मान्य करायला हवी. जे स्वाभाविकपणे घडायला हवे होते, जे धर्म म्हणून मानले जायला हवे होते ते घडले नाही. आणि ते घडावे असे जे प्रयत्न आमच्याकडे झाले तेही फारसे मोठे व मूलगामी स्वरूपाचे झाले असे म्हणता येत नाही. दंगे झाले की, ज्या अनेक चिंता पुढे येतात त्यात "राष्ट्रीय एकात्मता" ही एक चिंता पुढे येते. आणि काही तात्कालिक चिंतन होऊन ती चिंता बाजूला (वा फाइलीत) फेकली जाते. खून, जाळपोळ, लुटालूट, बलात्कार इत्यादि साधनांनी ऐक्याला तडा जातो आणि मग त्या भावनेच्या रक्षणार्थ काही ठराव, काही कायदे, काही जादा अधिकार आणि बऱ्याचशा मलमपट्ट्या ह्यांचा आधार घेण्याचा प्रयत्न होतो. तो प्रयत्न अप्रामाणिक नसतो. भावना उदात्त असते. मोठी असते. पण 'राष्ट्रीय एकात्मते'-बद्दलची भावना हा कधी वाद विषय नव्हताच. (अपवाद—कम्युनिस्ट व परकीय मिशनऱ्यांचा आधार घेतलेले नागा-मिझो) त्या बाबतची 'कृति' हीच नेहमी वादविषय बनली होती, आहे. दंग्याच्या एखाद्या तात्कालिक उद्रेकामुळे आपण त्याला फुंकर घालू पाहतो. परंतु मध्यंतरीच्या काळात ती भावना जोपासण्याचा, तिला खतपाणी घालून फुलविण्याचा, तिला वैध संरक्षण देण्याकरिता काटेकोर पालन झाले नाही तर गुन्हेगार (मग ते कुणीही व कोणत्याही धर्माचे असोत. ते 'राज्यकर्त्या' पक्षाला मते देत असोत वा नसोत) जे असतील त्यांना कडक शासन करण्याचा प्रयत्न होताना दिसत नाही तोवर हे ठराव व ही आवाहने अशीच 'हवा' उत्पन्न करून हवेतच विरून जातील. एकात्मतेचे आवाहनही करू आणि सिव्हिल कोड मात्र करणार नाही, एकात्मतेचे आवाहन करू आणि एकीकडे मुसलमानांना 'मुसलमान' म्हणून वेगळे मानमरातब, हक्क, अधिकार देतच राहू, त्यांचा विचार 'जातीय' दृष्टीने करीत राहू तर तसे होणे हे ह्या भावनेच्या मुळावरच घाव घालणारे ठरण्याचीच अधिक शक्यता ! संयुक्त विद्यालये









# 'विष्णुदास' दांडेकर गेले

महाराष्ट्राच्या वारकरी संप्रदायाचे एक अनभिषिक्त नेते, संतवाङ्मयाचे एक महान अभ्यासक व संशोधक, रसाळ कीर्तन–प्रवचनकार, विद्वान व विद्यार्थिप्रिय प्राध्यापक, प्राचार्य शं. वा. तथा सोनोपंत दांडेकर हे हृदयविकाराने वैकुंठवासी झाले ही वार्ता वाचून मन विषण्ण झाले. त्यांचा मृत्यु तसा अकल्पित नसला (ते गेले काही दिवस ही झुंज देत होते) तरी तो घडल्यानंतर उरते एक पोकळी! माणूस जातो. पोकळी उरते. महापुरुषांबाबत तर हे नेहमीच घडते. प्राचार्य दांडेकर हे पोकळी ठेवून जाणाऱ्या महापुरुषातले एक होते. श्रद्धेने ज्या काळात माणसे संस्कारित होत होती, जीवननिष्ठा मिळवीत होती. जीवनाची बाजी लावण्याची होड लावीत होती अशा काळात सोनोपंत जन्मले–वाढले. त्यामुळे ऐहिकात राहूनही पारमार्थिकाचा ध्यास त्यांनी घेतला. मोहमयी जगात सतत वावरूनही मोह जिंकला. ज्ञान देता देता स्वतःच "ज्ञानमय" झाले. प्रकाश किरण देता देता स्वतःच "प्रकाशमय" झाले. साधना शिकवता शिकवता स्वतःच 'तपस्वी' झाले. अंधार उरला नाही. भ्रम सरले. रस्ता स्पष्ट दिसू लागला. त्या वाटेवरून ते सतत वैकुंठाचीच वाट चालत गेले. आता ते तेथें जाऊन पोहचले आहेत. 'सावळ्या'ने त्याना स्वतःत सामावून घेतले आहे. वारी संपली आहे. वारकरी दांडेकरांना पांडुरंगाने पायाशी घेतले आहे. दांडेकरांच्या रूपाने पाठविलेले एक 'मिशन' संपले आहे. ही माणसे तर देवाची लाडकी! इकडे आपण हळहळतो आहोत. त्या अमरापुरीला आता आनंदोत्सव होत असेल.

प्राचार्य सोनोपंत दांडेकर हे मिशनरी होते. मिशन स्वीकारल्यानंतर ते 'अविचल' राहिले. 'ज्ञानेश्वरी' व सर्व संत वाङमय हे त्यांचे श्रद्धाकेंद्र होते. त्यांनी लिहिलेली "सार्थ ज्ञानेश्वरी" ही तर मुमुक्षु मार्गावरील वाटसरूंची "गीता'च मानली जाते. "ज्ञानेश्वरी"चा भावार्थ तर त्यांनी रसाळ भाषेत सांगितलाच. पण अवघड शब्दांची सूची शेवटी दिल्याने अभ्यासकांची सोय केली आहे. ज्ञानेश्वरी संबंधात त्यांनी अनेक लेख लिहिले तसेच ज्ञानेश्वर चरित्र–ग्रंथ व तत्वज्ञान, ईश्वरवाद, वारकरी-पंथाचा इतिहास इत्यादि ग्रंथ लिहिले, तसेच व्यंकटस्वामींची ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा, संत वचनामृत आणि शासकीय ज्ञानेश्वरीचे संपादन केले. पण ह्याहीपेक्षा सोनोपंतांची एक कामगिरी फार मोलाची आहे असे मला वाटते. ती म्हणजे 'वारकरी' संप्रदायाला त्यांनी प्राप्त करून दिलेली प्रतिष्ठा! सुशिक्षितांमध्येही 'वारी'चे वेड सोनोपंतांनी पेरले असे म्हटले तर अतिशयोक्ति ठरू नये. पांच-पंचवीस टाळकऱ्यांचा ताफा पाठीशी घेऊन जेव्हा सोनोपंत कीर्तनाला उभे रहात तेव्हा पुण्यातच पंढरपूर अवतरल्याचा भास होई. सोनोपंतांचे कीर्तन आणि टाळकऱ्यांचे भजन व एकूण साथ हा मेळ मोठा अपूर्व वाटे. सोनोपंत हे नैष्ठिक ब्रह्मचारी होते. विद्या व्यासंग आणि श्रद्धा यातून एक आगळे तेज त्यांच्या गोऱ्यापान चेहऱ्यावर विलसत असे. 'बोले तैसा चाले' ह्या वृत्तीचे ते होते. त्यामुळेच प्राचार्यपदावर असतानाही त्यांनी कॉलेजचे वातावरण निरामय करून टाकले होते. चालक–विद्यार्थी व प्राध्यापक ह्यांच्यात स्नेहमय वातावरण निर्माण करण्यात ते यशस्वी झाले होते. संसारात राहून, संसाराचे सारे खेळ पाहूनही दांडेकर विरागी राहिले आणि विरागी जीवनातही त्यांनी 'कर्मयोग' सोडला नाही. म्हणूनच ते वारकऱ्यांचे नेते बनू शकले आणि येणाऱ्या पिढीचे प्राचार्यपदही त्यांना भूषविता आले. प्राचार्य सोनोपंताची 'वारी' कधी चुकली नाही. यंदा चुकली. आषाढी पार पडली. वारी परतली आणि ह्या 'विष्णुदासा'साठी आळंदीला गोळा झाली. टाळ मृदुंगाचा घोष दुमदुमला. पांडुरंगाचे संकीर्तन घडले. 'ज्ञानबा तुकारामा'ने इंद्रायणीकाठ थरारला. आणि ज्ञानराजांचा हा श्रेष्ठ उपासक, भक्त, संशोधक अग्निशिखेवर स्थिरावला. ज्वाळातून सूर ऐकू येत होतेः

आम्ही जातो अमुच्या गावा
अमुचा रामराम घ्यावा!

सारी शिरे नत झाली. आणि म्हणाली, मामासाहेब अमुचा रामराम घ्यावा. मामासाहेब, अमुचाही राम राम घ्यावा.

—संपादक

विद्यापीठे, ज्ञानकेंद्रे, सामाजिक सस्था, सिव्हिल कोड करणे, उगाच निधर्मीत्व सिद्ध करण्यासाठी मुस्लिम अनुनय न करणे, भारतद्रोही शक्तींना शासन (मग, त्या हिंदु, मुस्लिम, ख्रिस्ती कुणीही असोत) इत्यादि गोष्टी घडत नाहीत तोवर हे प्रयत्न अपुरे पडतील. 'वेगळे' समजून मग ऐक्यासाठी आवाहने केली तर ती वांझोटी ठरतील. सौदा व सौदेबाजीलाच ते आवाहन ठरेल. जुना खेळ पुन्हा चालू होईल. यातूनच पाकची निर्मिती झाली हा इतिहास विसरण्याइतका जुना झाला आहे असे मला वाटत नाही. 'राष्ट्रीय एकात्मता' म्हणजे काही गोधडी नाही. रंगीबेरंगी ठिगळे जोडली की, ती साधेल ही कल्पनाही चुकीची आहे. 'एकात्म' होण्यासाठी मूलभूत विचार केला जाणे आवश्यक आहे. शिक्षण हा पाया आहे. 'विलग' करणारे कायदे नष्ट करणे हा दुसरा उपाय आहे. 'सिव्हिल कोड' करणे हा तिसरा उपाय आहे. भाषावार प्रांतरचना झाल्या असल्या तरी ती सोय म्हणून केलेली गोष्ट होती. ती एकात्मतेवरच आघात करीत असेल तर त्याचाही पुर्नविचार करणे व त्याबाबतचे निर्णय घेताना 'राष्ट्रीय' पातळीचाच प्रामुख्याने विचार करणे हे अगत्याचे. 'जातीय' नांवाने ओळखल्या जाणाऱ्या व जातीयवादाचे अड्डे बनू शकणाऱ्या शिक्षण संस्थांची परिवर्तने घडवून आणणे. अराष्ट्रीय प्रचार करणाऱ्या व पाकिस्तान झिंदाबादची भावना प्रसृत करणाऱ्या वृत्तपत्रांना, व्यक्तींना व संस्थांना कडक शासन करणे, अवैध घुसखोरांना देशाच्या भूमीतून हद्दपार करणे, शासन करणे, 'दरडोई एक मत' हा सिद्धांत, लायकीप्रमाणे संधि हे मार्ग आचरले गेले तरच काही चांगले घडू शकेल. शासनाने भरपूर कायदे केले आहेत. परंतु त्यांचा वापर काटेकोरपणे होत नाही तोपर्यंत अधुनमधून अराष्ट्रीय शक्तींचा उद्रेक अपरिहार्य ठरतो. मग तो शेख अब्दुल्लाच्या मुखाने होवो वा औरंगाबादला 'पाकिस्तान झिंदाबाद'च्या घोषणांनी होवो. नागपूरच्या वार्ता तर फार अस्वस्थ करणाऱ्या आहेत. शासनाने संरक्षण दिले नाही (वा ते अपुरे ठरले) तर माणसे काही 'योगी' नसतात. ज्यांची मुले माणसे हालहाल करून मारली

[पृष्ठ ६४ वर पहा]

# हिरा जो "चमकलाच" नाही !!

**अनेक** नवीन नाटके रंगमंचावर आली. येताना ती खूप गाजावाजा करीत आली (तेही स्वाभाविकच— धंदाच तो) **हिरा जो भंगला नाही** हे एक असेच खूप गाजावाजा करीत रंगमंचावर आलेले नाटक! गाजावाजा होण्याची कारणे अनेक. बेडेकर पतिपत्नींची कीर्ति हे एक प्रमुख कारण. 'ॲनास्ताशिया' ह्या झार कन्येच्या सुपरिचित कथेवरचे हे नाटक हे दुसरे कारण. गूढता आणि आंतरिक संघर्षाची झालर हे तिसरे कारण. विलेपार्ले म्युझिक सर्कलसारखी साक्षेपी प्रयोग सादर करणारी मातब्बर संस्था ह्या निर्मितीच्या पाठीशी होती हे चौथे कारण आणि सुमति गुप्ते, सतीष दुभाषी, इंदुमति पैंगणकर, जयंत सावरकर यांच्यासारखी काही मातब्बर व गुणी कलाकार मंडळी कामे करणार होती हे पांचवे कारण. त्यामुळे नाट्यगृहात जाणारी माणसे फार मोठ्या अपेक्षेने जात—जातात. पण बाहेर येताना संपूर्ण समाधान पावून मात्र परत येत नाहीत. असे कां होते? नाटकाची मूळ आधारभूत असलेली कथा अतिशय समर्थ व नाट्यात्म असूनही असे कां व्हावे? नट कमी पडतात की लेखक (इथे लेखिका) कमी पडतो? राजघराण्याचे वातावरण निर्माण होते का? गूढता मारक ठरते? की आजच्या काही 'पॉप्युलर' स्लोगन्सच त्यात नको इतका वापर केल्यामुळे हे घडले आहे? लेखिकेतला प्रचारक, चिंतक व चिकित्सक या नाटकात जरा स्पष्टपणे डोकावतो म्हणून तर हे घडले नसेल? नाटक पाहून आल्यापासून मी ह्या वरील प्रश्नांच्या अनुषंगाने विचार केला. ह्या नाटकाला देशी पेहराव देण्यात लेखिका खूपच यशस्वी झाली आहे हे मी सर्वप्रथम नमूद करतो. 'ॲनास्ताशिया'च्या कथानकाशी प्रस्तुत नाटकाचा संबंध आहे हे सांगितले आहे म्हणूनच ते खरे मानावे, अन्यथा हैद्राबादजवळच्या साकीना संस्थानातही रझाकारी अत्याचारांच्या पार्श्वभूमीवर हे कथानक घडू शकते हे आपण मानले असते. जुन्या संस्थानी प्रजेच्या राजघराण्याबाबतच्या निष्ठाही आपल्याला सुपरिचित आहेत. तेव्हा त्या राजघराण्यातील एका मुलीच्या शोधार्थ राजनिष्ठांनी प्रयत्नशील रहावे व त्या निष्ठांना तडा जाईल असे दिसताच अस्वस्थ व्हावे हे सारे स्वाभाविक वाटते. अशी एखादी संधि वैयक्तिक महत्त्वाकांक्षेच्या पूर्तीसाठी राबवावी असे एखाद्या धाडसी तरुणाला वाटणे हेही संपूर्णपणे स्वाभाविक वाटते. त्या दृष्टीने मूळ नाटकाचा सारा साचा कायम ठेवून सौ. मालतीबाईंनी हे भारतीय रुपांतर सादर केले आहे. पण रुपांतर सादर करताना काही स्वातंत्र्य घेतले असते तर बरे झाले असते असेही त्या नाटकाची संथ गति पाहून म्हणावेसे वाटते. त्याबाबत पुन्हा विचार व्हावा असे वाटते. काही प्रसंग, वाक्ये गाळणे वा त्यांना नवे, गतिशील रूप देणे अगत्याचे वाटते. आणखी काही गोष्टी—थोरल्या मासाहेबांचा जो दबदबा पहिल्या अंकात निर्माण केला गेला आहे तो ध्यानी घेता एखादी 'उठवळ' बाई तिची दासी दाखवण्यात 'तार्किक' औचित्य नाही. जी बाई करारी आहे. आघातांनी 'सावध' झालेली आहे. प्रत्यक्ष नातीला नात म्हणायला सुद्धा जी सहजपणे तयार होत नाही तिची दासी तिच्या इतमामाला साजेशी कां नसावी? डॉ. भास्कर पाहताना सारखी 'सुंदर मी होणार'-मधल्या कवि संजयची आठवण येत होती. त्याचे बोलणे, चालणे, वागणे फारच कृत्रिम, नाटकी वाटले. ती व्यक्तिरेखा मनावर कसलाही खोल असा परिणाम करून जात नाही. (तिने तसा तो करावा अशी अपेक्षा कां असा प्रश्न येईल. उत्तरशेवटी राजकन्या राज्यवैभवाचा त्याग करून देशाच्या सेवेसाठी जाते असे जे सूचित केले आहे, तेथे ती डॉक्टर भास्करकडेच जाते आहे असे पूर्वसंदर्भावरून सूचित होते. म्हणून डॉ. भास्कर हा प्रभावी होणे अगत्याचे होते) ह्या नाट-



कातली सौ. सुमति गुप्ते यांची भूमिका मला मुळीच आवडली नाही हे लिहिताना मला दुःख होते. त्यांच्या कितीतरी चांगल्या भूमिका मी पाहिल्या आहेत, म्हणूनच हे लिहिले आहे. त्यांच्या संवाद म्हणण्याच्या पद्धतीत आता तोच तो पणा येऊ लागला आहे हे फार जाणवते. त्या महाराणी वाटल्या. पण जाणवल्या नाहीत. सतीश दुभाषी हे ह्या नाटकाचे चालक—सूत्रधार. त्यांना उमदे व्यक्तित्व लाभले आहे. त्यांच्या चिमुकल्या दाढीपासून ते शिकारीच्या पोषाखापर्यंत त्यांच्या मनावर स्वार झालेल्या 'काकाजी'चे सातत्याने दर्शन घडत होते ते क्वचित प्रसंगी विरसही करून जात होते. त्यांची भूमिका ही नुसत्याच सूत्रधाराची नव्हती तर खलत्व सूचकही होती. तशी ती सतत वाटली—जाणवली मात्र नाही. शेवटच्या अंकात 'हीच ती राजकन्या' आहे असे कळल्यानंतर त्यांना बसलेले धक्के—त्यातून उडालेला मनाचा गोंधळ वगैरे गोष्टी ते समर्थपणे रंगवू शकले नाहीत. तरीही त्यांची प्रस्तुत नाटकातील भूमिका त्यांना मोठेपण देऊन जाते. मोठी असूनही त्यांनी तिचा तोल जाऊ दिला नाही खास! इंदुमति पैंगणकर ही आजच्या रंगभूमीवरची एक गुणी अभिनेत्री! तिची जी कामे मी पाहिली ती सारी मला आवडली असे म्हणता येत नसले तरी तिला अभिनयाची, भूमिकेची चांगली जाण आहे ह्याचा प्रत्यय मात्र मी अनेकवार घेतला आहे. ती राजकन्या दिसते आणि जाणवतेही! पहिल्या अंकातला तिचा अभिनय मला आवडला. एका प्रसंगात मात्र ती हिंदी चित्रपटाच्या एखाद्या नायिकेसारखी जी 'पोझ' घेऊन पडते. ते मात्र बरेचसे








'चीप' वाटते (दिग्दर्शक–प्लीज नोट) दिग्दर्शकाने आपले काम तसे चांगले बजावले आहे. जयंत सावरकर यांचा गणाचार्य चांगलाच ध्यानी राहतो. ही दुक्कल पाहताना 'अश्रूंची झाली फुले'मधली काही प्राध्यापक मंडळी पुन्हा भेटल्याचा भास होऊन गेला. असे असले तरीही हा प्रयोग देखणा होतो हे मात्र खरे. व्याख्यानबाजी, श्लेषात्मक प्रचाराचा भाग कमी केला तर ? विचार व्हावा ह्या सूचनेचा! 'नमस्ते सदा वत्सले' ह्या गीताबद्दल काही आक्षेप घेण्यात आले आहेत. ते अगदीच अप्रस्तुत आहेत असे म्हणता येत नाही. 'रझाकार' पार्श्वभूमीवरील ह्या नाटकाला त्यामुळे आणखी वेगळा 'वास' येण्याची शक्यता नाकारता येत नाही (निदान सध्याच्या 'नाजुक' परिस्थितीत तरी) ह्या नाटकाला 'गति' आली तरच हे नाटक काही 'प्रगति' करील असा भरवंसा वाटतो. एरव्ही प्रेक्षक 'गर्दी' करतील असा संभव कमी ! !

–चित्रगुप्त

( पृष्ठ ६२ वरून......दीपमाला )

जातात, त्यांना 'शांत रहा' म्हणून नुसती प्रवचने झोडून काही उपयोग होत नाही. शासनाने 'बहुसंख्य–अल्पसंख्य' हा विचार नेहमी गौण मानला पाहिजे. नागरिक-प्रजाजन हा विचार महत्वाचा. निवडणुकीचे 'सौदे' ह्या आड येतात आणि मग माणसे बिथरतात. ती सौदेबाजी अखेर साऱ्या चांगल्या शक्तींना व प्रवृत्तींनाच मुळी खायला उठते. देशाच्या हितशत्रूंना पायघड्या, त्यांच्यासाठी लक्षावधींची उधळण होत असेल आणि देशाचे नेहमी मंगल चिंतणाऱ्या, प्रसंगी आयुष्याची बाजी लावणारांची मात्र उपेक्षाच होणार असेल तर ही सारी आवाहने फलदायी ठरणार नाहीत. राष्ट्रीय एकात्मतेची खरी कसोटी शासनाची एतद्विषयक प्रामाणिकता हीच आहे असे मला वाटते. औरंगाबाद प्रकरणी तर शासनाचे एक प्रमुख घटकच काहीसे प्रत्यक्ष–परोक्ष पद्धतीने जबाबदार होते अशा वार्ता आहेत. त्या जर खऱ्या असतील तर (नसोत बिचाऱ्या) त्या कृत्यांना केवळ जातीय ( व अनुनयवादी) भूमिकेतून 'संरक्षण' देणे हे 'मूले कुठारः' ठरणार आहे. अखेर ह्या साऱ्या देशात जनतेला समानतेनेच वागविले गेले पाहिजे. (कारण घटनेचीच मुळी ती प्रतिज्ञा आहे.) पण 'सौदा'प्रधान राजकारणात ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाही. सर्व जाती, प्रांत, भूभाग, भाषा, उपजाति व पोटजाती यांचा विचार करून सारी राज्ययंत्रणा जोपर्यंत राबविली जात आहे तोपर्यन्त एकात्मतेची प्रवचने ही फारसे काही साधू शकणार नाहीत. तसे साधले जाणे मात्र अत्यंत अगत्याचे आहे. अनेक कारणांसाठी ते अगत्याचे आहे. सीमेवर दोन विघ्नसंतोषी राष्ट्रे संगिनी रोखून उभी आहेत. आसाम नागा, मिझो टेकड्यातून सुरुंग पेरले गेले आहेत. 'झारखंडा'ची घोषणा दिली जात आहे. अमेरिका रशियाचा भरवसा देता येईल अशी स्थिति नाही. भोवती भरवशाचे मित्र नाहीत, अशा काळात अंतर्गत एकात्मता हा एकच आधार ह्या देशाला तारू शकेल. पण त्यासाठी शासनाने अधिक कंबर कसली पाहिजे. म्हणजे मग जनता मुक्त मनाने ह्या यंत्रणेचा जयजयकार करील. कायद्याने सहाय्य होते. पण मूळ भावना बदलायला माणसेच बदलावी लागतात. शासन खरोखरच बदलणार आहे काय ? थांबावे आणि बघावे (दुसरे आपण तरी काय करणार? )

– सारस्वत








# कै. भोबे स्मारक निधी

कै. गोपाळकृष्ण भोबे यांच्या स्मारकासाठी त्यांच्या मित्रानी आणि चाहत्यानी जाहिरातीच्या रूपाने आणि रोख देणग्या दिल्या आहेत. त्यांची यादी खाली दिली आहे. या सर्व देणगीदाराना कै. गोपालकृष्ण भोबे स्मारक निधी समितीतर्फे मनःपूर्वक धन्यवाद !

'स्मारक-निधी'चा एकूण जमाखर्च व विनियोग याचा तपशील पुढील अंकात प्रसिद्ध करण्यात येईल.

| नांव | रुपये |
|---|---|
| गोवा दमण व दीव शासन | १००० |
| श्री. भाऊसाहेब बांदोडकर | १००० |
| श्री. सुशिलकुमार रुईया | १००० |
| श्री. श्रीगोपाळ नेवाटिया | १००० |
| भुलाभाई देसाई मेमोरिअल ट्रस्ट | ५०१ |
| मेसर्स चौगुले आणि कं. प्रा. लि. | ५०० |
| " व्हि. एस्. धेंपे आणि कं. प्रा. लि. | ५०० |
| " काशिनाथ दामोदर नायक | ५०० |
| संगीत मैफील | ५०० |
| कृष्ण नारायण नायक | ४०० |
| गोल्डस्टार मशिनरी कं. | ४०० |
| एम्. एस्. भोबे काकुले | ४०० |
| हिंद रेझर आणि ब्लेड कं. लि. | ३०० |
| वसंतराव जोशी | ३०० |
| साराभाई केमिकल्स् | ३०० |
| झेनिथ स्टील पाईप लि. | ३०० |
| इंडियन ह्यूम पाईप कं. लि. | ३०० |
| म्हात्रे पेन आणि प्लास्टीक इंडस्ट्रीज प्रा. लि. | ३०० |
| ए. जी. वागळे | ३०० |
| केणी ब्रदर्स | ३०० |
| राजेंद्र वा. देशप्रभू | ३०० |
| व्हि. पी. पै भले आणि बंधू | ३०० |
| वासुदेव रा. पै. धुंगट | ३०० |
| गोविंद रामनाथ कारे | ३०० |
| व्हिसो ट्रेडिंग कं. | ३०० |
| सह्याद्री फिल्म्स् | ३०० |
| व्यंकटेश गोविंद कामत | ३०० |
| कॅलिको केमिकल्स् आणि प्लास्टीक डिव्हिजन | ३०० |
| हार्डकॅसल आणि वॉड कं. प्रा. लि. | ३०० |
| कॅम्फर आणि अलायड प्रॉडक्टस् लि. | ३०० |
| महाराष्ट्र शासन | ३०० |
| किर्लोस्कर ऑइल इंजिन लि. | ३०० |
| स्वस्तिक रबर प्रॉडक्टस् लि. | ३०० |
| कूपर इंजिनिअरिंग लि. | ३०० |
| शांतिलाल खुशालदास | ३०० |
| ब्राइट स्टील कॉर्पोरेशन | ३०० |
| आगफा गेव्हर्ट इंडिया लि. | ३०० |
| मोसांतो केमिकल्स् इंडिया लि. | ३०० |
| पॉप्युलर प्रकाशन | ३०० |
| सक्सेरिया भिशन शुगर फॅक्टरी प्रा. लि. | ३०० |
| माधवराव तळावलीकर | २५१ |
| श्री. बी. एल्. पाठक | २०० |
| इंडोको रेमेडीज लि. | २०० |
| वेस्टर्न इंडिया व्हेजिटिबल प्रॉडक्टस् लि. | २०० |
| हरक्युलस होइस्टस् लि. | २०० |
| नवनीत प्रकाशन लि. | २०० |
| वेस्ट कोस्ट पेपर मिल्स् लि. | २०० |
| विष्णू नारायण नायक | २०० |
| गोवा बोटलिंग कं. प्रा. लि. | २०० |
| कंस्ट्रक्टर्स आणि ट्रेडर्स | २०० |
| स्टुडिओ आर. आर. प्रभू | २०० |
| इंडस्ट्रीयल प्लास्टीकस् | २०० |
| दलाल आर्ट स्टुडिओ 'दीपावली' | २०० |
| हिरालाल आणि कं. | २०० |
| बाँबे डॉक वर्कर्स को. क्रेडीट सोसायटी लि. | २०० |
| ज्युपिटीयर जनरल इन्शुरन्स कं. लि. | २०० |
| प्रभादेवी डायस् आणि केमिकलस् प्रा. लि. | २०० |
| दिल्ली क्लॉथ मिल्स् | २०० |
| शिवाजी वर्क्स लि. | २०० |
| एस्. एच्. केळकर आणि कं. प्रा. लि. | २०० |
| भारत रेडिएटर्स प्रा. लि. | २०० |
| मौज प्रकाशन गृह | २०० |
| सिंदिया स्टीम नॅव्हिगेशन कं. लि. | २०० |
| ए. बी. सी. कं. प्रा. लि. | २०० |
| शिपिंग कॉर्पोरेशन ऑफ इंडिया लि. | २०० |
| मॅजेस्टीक बुक स्टॉल | २०० |
| राम भैया | २०० |
| एस्. एम्. डहाणूकर | २०० |
| लि आणि मूरहेड | २०० |
| लोज कामता | १५१ |
| राजदत्त फोटो स्टुडिओ | १०१ |
| दिनकर डहाणूकर | १०१ |
| दादासाहेब डहाणूकर | १०१ |
| भरणे आणि कं. | १०१ |
| सुचेता भिडे | १०१ |
| रामकृष्ण वा. नायक | १०० |

| | | | |
|---|---|---|---|
| लैला भटकळ | ५१ | श्रीमती मैनाताई गोखले | २५ |
| आर. आर. पाटकर | ५१ | डॉ. व्यं. पा. कामत | २१ |
| नरेंद्र बा. कामत | ५१ | राम देशमुख | २१ |
| सी. पी. रेळे | ५१ | वि. ज. पेठे | २० |
| ए. स्वादी | ५१ | शशिकला आळंदकर | २० |
| एम्. डी. फळणिकर | ५१ | आनंद साधले | २० |
| सि. व्ही. पणशीकर | ५० | एम्. डी. जेमकर | ११ |
| उषाकांत लादीवाला | ५० | ट्रिनिटी क्लब | ११ |
| शिरीश पटेल | ५० | पंडीत महाजन | १० |
| यमुनाबाई शेवडे | ५० | अरुण मजुमदार | १० |
| प्रा. म. वि. राजाध्यक्ष | ५० | बंडा गाडगीळ | १० |
| कांटिनेंटल प्रकाशन | ५० | ए. एस्. गोखले | १० |
| वा. रा. सोनार व मित्र | ३३ | नारके | १० |
| हरिभाऊ विश्वनाथ आणि कं. | ३० | काकासाहेब मुजुमदार | १० |
| कौसल्या मंजेश्वर | २५ | काकासाहेब घोरपडे | १० |
| के. व्ही. राऊत | २५ | एस्. के. भागवत | १० |
| एम्. एस्. शेटचे | २५ | एस्. बी. दामले | १० |
| आर. व्ही. सावंत | २५ | श्री. भातीजा | १० |
| जगन्नाथबुवा पुरोहित | २५ | हेमचंद्र गुप्ते | १० |
| सुरेश गजेंद्रगडकर | २५ | व्यंकटेश पंडित | १० |
| श्रीराम कामत | २१ | व्ही. व्ही. पत्की | १० |
| एन्. एस्. बेंद्रे | २५ | एस्. एच्. रायकर | ५ |
| चेतन आणि कुमार | २५ | एन्. आर. मुरुळकर | ५ |
| रविंद्र वेर्लेकर | २५ | वसंतराव पटवर्धन | ५ |
| शशिकांत आणि मुळे | २५ | आर. बी. केळकर | ५ |
| प्रभाकर अत्रे | २५ | | |
| आर. डी. बाक्रे | २५ | एकूण रु. | २३,९९७ |

### (पृष्ठ १० वरून......आचार्य अत्रे)

लोकांना रोखठोक उत्तर आहे. वाङ्मयाचा सहवास त्यांना फार प्रिय असला तरी त्यांचा पिंड पत्रकाराचा आहे. पत्रपेशातही त्यांचे एक खास वेगळेपण आहे. त्या वेगळेपणात महाराष्ट्राविषयी सद्भाव आहे, देशाबद्दल अभिमान आहे, थोरांबद्दल आदर आहे, सार्वजनिक सेवेचा आव आणणाऱ्या समाजकंटकांबद्दलचा संताप आहे, मराठी भाषेची ओढ आहे, दिनदुबळ्यांबद्दल अन् गरीबांबद्दल कळवळा आहे अन् अन्यायाची तीव्र चीड आहे. असे वेगळेपण त्यांच्यात आहे म्हणूनच लोकप्रियतेचा वरदहस्त अनेक वर्षे त्याना लाभलेला आहे.

अत्र्यांमध्ये दोष नाहीत असे कुणीच म्हणत नाही. त्यानाही त्याची जाणीव आहे. 'माझ्या हातून अनेक प्रमाद झाले आणि अजूनहि होत आहेत.' अशी कबुली त्यांनी १० वर्षांपूर्वीच अत्रे गौरवग्रंथात जाहीरपणे दिली आहे. त्यांच्यासारखी दोष असलेली माणसे महाराष्ट्रात खंडोगणतीने सापडतील. पण त्यांच्यासारखा पराक्रम असलेली, सद्गुण असलेली अन् आपल्या लेखनशक्तीचा अन् सामर्थ्याचा उपयोग सार्वजनिक कार्यासाठी वेचणारी मंडळी हाताच्या बोटाएवढीही मिळणार नाहीत. त्यांचे जीवन आदर्श आहे असा त्यांचाही दावा नाही. पण त्यांचे कर्तृत्व विविधांगी असल्याने त्यापासून तरुण पिढीला सदैव स्फूर्ती घेता येईल.

सत्तरीची कालसीमा अत्रे आता ओलांडत आहे. यापुढेही उत्तम आरोग्याचा लाभ त्यांना होवो अन् 'मराठा'चा रौप्य महोत्सव त्यांच्या डोळ्यादेखत पार पाडण्याचे दीर्घायुष्य परमेश्वर त्याना देवो अशी माझी त्यांच्या वाढदिवशीची प्रार्थना आहे. शहाजहानचे दोष कालौघात नष्ट झाले पण त्याचा ताजमहाल आजही जगाच्या कौतुकाचा विषय बनला आहे. त्याप्रमाणे कालप्रवाहात अत्र्यांचे सारे दोष अन् प्रमाद वाहून जातील. राहील ते त्यांचे ताजमहालासारखे उत्तुंग अन् अष्टपैलू कर्तृत्व नि कीर्ती. आज त्यांच्या एकाहत्तरीचा विचार मनात आला की त्यांचे गुरू गडकरी यांच्या पुढील काव्य-पंक्ती माझ्या तोंडावाटे सहज निघून जातात–

शहाजहाना आधी मेली ख्यालीखुशाली ती त्याची
खडा तेवढा ताजमहालच भूषा जी या जगताची

•••








REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment AUGUST 1968

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4


